// सारस्वत //

( गोंय सारस्वत समाजाचें त्रैमासिक प्रकाशन)

वर्स २ आश्विन - मार्गशीर्ष - १९१५ अंक ३




## 'सारस्वता' विशीं...

सारस्वत पत्रिकेचो हो सातवो अंक. दर एका अंकांत समाजाच्या साबार घटकांची मागणी आनी गरज लक्षांत घेवन शाश्वत म्हत्त्व आशिल्ले, सारस्वत संप्रदाय आनी संस्कृतीच्या तरेकवार आंगांचेर बरयिल्ले तीन भासांतले माहितीपूर्ण लेख आमी उजवाडायत आयल्यात. वाचप्यांकडल्यान जो प्रतिसाद मेळ्ळा, ताका लागून आमची उमेद वाडल्या.

सारस्वत समाज-जिणेकडेन संबंद पावता अशा घडणुकांची डायरी उजवाडावपाची प्रथा चालू दवरची अशी कांय वाचप्यांची मागणी आसा. परत सारस्वत हें त्रैमासिक जाल्ल्यान खूबश्यो घडणुको छापून येयीसर पोरन्यो जाल्ल्यान लोकांक त्यो शेळ्यो दिसतात. कांय वाचप्यानीं तर अशीय सुचोवणी केल्या कीं प्रसंगीक घडणुकांचेर आदारिल्लें बरप 'सारस्वतां'त निखालच छापचें न्हय. त्याभायर, देवस्थानां आनी समाजीक संस्था आपूण जावन घडणुकांची वार्ता आमचेमेरेन पावयनात आनी तशो वार्ता पुंजावपी वार्ताहर आमचेकडेन नात, ही एक अडचण उरताच.

सारस्वताचो अंक हो एक विशाळ ग्रंथाचो भाग, हें वळखून वाचप्यांनी आपले अंक सांबाळून दवरचे. पोरन्या अंकांखातीर आयिल्ल्यो सगळ्यो मागण्यो मानून घेवप कठीण जाता, देखून ही सुचोवणी.

संपादक

**

SARASWAT
Vol. II ✻ No 3

✻

संपादक मंडळ :
Editorial Board:
प्रभाकर आंगले
Prabhakar Angle
दामोदर न. नायक
Damodar N. Naik
चंद्रकांत केणी
Chandrakant Keni

✻

संपादकः
Editor:
चंद्रकांत केणी
Chandrakant Keni

अक्षर-जुळणी आनी मुद्रकः
Typesetters & Printers:
ओमेगा एन्टरप्राइझेस
Omega Enterprises
Vidyanagar Colony, Lane 3
Vidyanagar, Margao (Goa) 403 601

✻

प्रकाशकः
Publisher:
रविंद्रनाथ. एस. कामत
Ravindranath S. Kamat
For Goa Saraswat Samaj
P. O. Box No 43
Margao (Goa) 403 601

FOR PRIVATE CIRCULATION

# अनुक्रम

## ह्या अंकांत





**All Correspondence to be addressed to :**

Goa Saraswat Samaj, "Govinda" Bldg., Panaji (Goa) 403 001
"Saraswat" Magazine, P. O. Box No. 43, Margao (Goa) 403 602

# श्री लक्ष्मी-नृसिंह देवस्थान

**विनायक नारायण शे. धुमे**

*इतिहासाचार्य विनायक नारायण शेणवी धुमे यांचा गोव्यांतील देवालयांचा अभ्यास दांडगा आहे. गोव्यातील बहुतेक सर्व प्रमुख दैवतांचा संशोधनपूर्ण इतिहास त्यांनी लिहिलेला आहे. प्रस्तुत वेलिंग येथील श्रीलक्ष्मी-नृसिंह या देवस्थानवरील त्यांनी लिहिलेला अभ्यासपूर्ण लेख आम्ही वाचकांसमोर ठेवीत आहोंत.*

कल्पान्तार्क प्रकारां त्रिभुवन मिखिलं तेजसा पूरयन्तं
सक्ताक्षं पिंगकेशं रिपुकुल भयदं भीमदंष्ट्राट्टहासम् ।।
शंखं चक्रं गदाब्जे पृथुतल मुसलं चापपाशांकुशारत्रं
बिभ्राणं दोर्भिराद्यं मनसि मुररिपुं भावये श्री नृसिंहम्।।

ॐ नमो भगवते नरसिंहाय नमस्तेजतेजसे आविराविर्भव
वज्रनख वज्रदंष्ट्र कर्माशयान् रंधय रंधय तमोग्रसग्रस
ॐ स्वाहा । अभयमभयमात्मनि भूयिष्ठा ॐ क्षौंम्.।

## नृसिंहाचल पुण्य नगरी वेलिंग कडे....

गोमांतकांत जीं अनेक हिंदु देवालयें आणि धार्मिक प्रेक्षणीय स्थळें आहेत, तीं बहुसंख्य फोंडा तालुक्यांत आहेत. तीं तशीं असण्याचें कारण काय व तीं कोणत्या काळीं, याची माहिती पुढील वेगवेगळया प्रकरणांतील मजकुरावरून लक्षांत येण्यास अडचण पडत नाहीं. फोंडा तालुक्यांतील या बहुसंख्य देवालयें आणि प्रेक्षणीय स्थळांमध्यें वेलिंग गांवांत असलेल्या श्रीलक्ष्मीनृसिंह, या सुप्रसिद्ध देवस्थानाचा अंतर्भाव होतो. या देवस्थानाचा प्राचीन इतिहास मोठा चित्तवेधक दिसतो.

गोमांतकाची राजधानी पणजी शहर, जिथें नदी किनाऱ्यावर बंदरांत मुंबईहून गोव्यांत येणारी प्रवासी वाहतूक करणारी आगबोट थांबते, त्या पणजी शहरापासून मडगांव या रेल्वे स्टेशनाकडे जाणारा जो प्रमुख डांबरी रस्ता आहे, त्या रस्त्यावरून नियमित प्रवासी वाहतूक करण्याऱ्या बसेसमधून पणजीहून निघून म्हार्दोळ बस स्टेशनवर उतरायचें. पणजी शहरापासून म्हार्दोळपर्यंत रस्ता अंतर २१ किलोमिटर आहे. म्हार्दोळ मोटारस्टँड पासून वेलिंग गांव अगदीं जवळ सीमेवरच आहे आणि त्या गांवांत जाणारा रस्ता जरा चढणीचा असून श्रीलक्ष्मीनृसिंह देवालयापर्यंत जाण्यास पायवाटेनें चालल्यास वीस मिनिटें वेळ लागतो. गरजू मनुष्यास तेथें जाण्यास म्हार्दोळ बस स्टँडवर टॅक्सी, मोटार सायकली, रिक्शा वगैरे वाहनेंही भाड्यानें मिळतात.

श्रीलक्ष्मीनृसिंह, देवस्थान एका शांत व सुंदर परिसरांत वसलेलें आहे. आसमंतांत प्रदेशांतील झुळझुळ वाहणारे गोड पाण्याचे झरे, वनपुष्पांचा मधुर सुवास, सृष्टी देवीने जिकडे तिकडे पसरलेला तो नेत्रानंददायक हिरवा गार गालिचा, गर्द झाडी, इत्यादि मनोरम सृष्टि-सौंदर्य अवलोकन करून, ज्याचें अंतःकरण वेधून जात नाहीं, असा मनुष्य विरळा! त्या देवस्थानचा प्राकार, अग्रशाळा, महाद्वार, मंदिरशिल्प वगैरे वैशिष्ट्यपूर्ण आहेत. देवस्थान, रस्त्यापासून थोडें उंचवट्यावर असून, थोडेसें अंतर चालून गेल्यावर महाद्वार आहे. त्यांतून प्रवेश केल्यावर प्राकारांत पोंचतों आणि पुढें श्रीलक्ष्मीनृसिंह मंदिरांत जातां येतें. हें मंदिर पूर्वाभिमुख असून प्राकाराचें महाद्वार दक्षिणाभिमुख आहे. प्रवासी यात्रेकरूनें प्राकारांत प्रवेश केल्यानंतर त्यानें डाव्या हाताकडे वळून सभामंडपांतून देवालयांत जावें लागतें. सभामंडप जुन्या पद्धतीचा प्रशस्त आहे. या सभामंडपांतून सोंडयावर व सोंडयानंतर देवालयाच्या चौकावर व त्यापुढें दोन अंतराळें आहेत. पैकीं गार्भागाराला लागून असलेल्या अंतराळांतून गार्भागारा भोंवतालची प्रदक्षिणा करण्याची वाट आहे. देवालयाच्या चौकाची रचना, त्याचे सभोंवार असलेले आठ लांकडी भक्कम खांब, ज्यांवर परिश्रम पूर्वक केलेलें कोरीव नक्षी काम फारच सुंदर,मनोवेधक आणि अप्रतिम आहे. या खांबांच्या वरच्या बाजूस, खांब व छत यांमध्यें दोनही चौकोनांच्या चारही बाजूंस दोन पट्टिका आहेत आणि त्यांत

लांकडी उठावाच्या सुंदर कोरीव मूर्ती आहेत. हें नक्षी कोरीव काम पाहिल्यानंतर जुन्या कालीं या वैभवाची महती फार मोठी होती, याची प्रचिती मिळते जुन्या कालच्या सर्वच देवालयांमध्यें कोरीवकाम विशेषेंकरून देवादिकांच्या लांकडी कोरीव मूर्ती, पुराणकालीन नानाविध कथानकांतील महत्त्वाचे प्रसंग, दशावतार, केशवादि चोवीस नांवांचे श्रीकृष्णापर्यंत अवतारांच्या सुंदर लांकडी प्रतिमा वगैरे दिसत होतें. हल्लींच्या अर्धशतक वर्षांच्या कालांत कांहीं देवस्थान मंदिरांचा जीर्णोद्धार झाला असला, तरी पूर्वींच्या मंदिरांत असलेलें लांकडी कोरीव काम काळजीपूर्वक शक्यतों जपून, राखून, योग्य त्या व्यवस्थित तऱ्हेनें देवालयांच्या व्यवस्थापकांनीं कोणत्या तरी दुसऱ्या दालनांत त्याचा उपयोग करून ठेवलेलें, अद्यापपर्यंत तरी पाहाण्यांत येतें. असें कोरीव काम आजच्या जमान्यांत करणारे कलाकार अगदीं विरळाच. या श्रीलक्ष्मी-नृसिंह देवस्थानांतही हें लांकडी कोरीव नक्षीकाम फार सुंदर आणि अप्रतिम आहे व तें तसें राखून ठेवल्याबद्दल आणि त्यावर कलापूर्ण रित्या ऑइल-पेंट केल्याबद्दल त्या देवस्थानच्या चालकांस भूषणास्पद ठरतें. देवालय मंदिरांतील जमीन संगमरवरी पाषाणानें मढविलेली आहे. गर्भागारावर देवालयाचें प्रमुख उंच शिखर आहे, आणि त्याचें खास वैशिष्ट्य आणि नमुना इतर देवालयांहून फार वेगळा आहे. नमुना आणि वैशिष्ट्य पाहून तें बांधणाऱ्या शिल्पकारांचें कौतुक करावें तेवढें थोडेंच. कारण, हें शिखर खालीं चौकोनी, त्यावरचा भाग अष्टकोनी, त्यावरचा भाग लिंगाकृती आणि त्यानंतर शेवटचा भाग केळीच्या घडास शेवटीं बोंडी असते, त्या बोंडीच्या आकारासारखा आहे.

देवालय मंदिराच्या गर्भागारांत उच्चासनावर श्रीलक्ष्मीनृसिंहची मोठी मूर्ती विराजमान आहे. याच्या पुढील भागीं छोट्या आसनावर लिंगाकृती व वर स्तंभाकृती पाषाणखंडाला टेंकून श्रीलक्ष्मीनृसिंहाची छोटी पंचधातूंची अभिषेक मूर्ती आहे. प्राचीन कालीं हें देवस्थान सासष्टी तालुक्यांतील शंखावली येथें असतांना "नायक" ब्राह्मण साधूला दृष्टांत होऊन त्याची जी उपास्य मूर्ती तेथील तलावांत मिळालेली असें सांगतात, ती हीच मूर्ती असल्याचा, त्या कालापासून आज तागायत त्या देवस्थानच्या कुळावी महाजन मंडळीचा दृढ विश्वास आहे. (या बद्दलचा कथाभाग पुढील संबंधित प्रकरणांत याच लिखाणांत वाचावयास मिळेल.)

गर्भागार, चौक, आणि सभामंडप झाल्यावर प्राकार संपतें. पुढें देवालयासमोरच गोड पाण्याचा तलाव असून त्यांतील पाणी स्वच्छ, शुद्ध असतें, कारण तलावाच्या समोर जो डोंगर आहे, तेथून एक झरा आपलें पाणी या तलावांत सोडतो आणि तें पाणी औषधी असल्याची ख्याती असल्यामुळें त्या झऱ्यावर आंघोळीसाठीं माणसांची रीघ लागलेली दिसते. याच झऱ्याच्या पाण्याचा वापर देवाच्या अभिषेकादि कृत्यांस करतात. हा तलाव चोहोंबाजूंनीं उंच भिंतीनीं बंदिस्त केला असून, तलावाची बांधणी मजबूत आणि सुरेख आहे. तलावाच्या पाण्याच्या पातळीपर्यंत व्यवस्थित आणि सोईस्कर रित्या पायऱ्या बांधलेल्या आहेत. देवालयाच्या प्राकारांत परिवार दैवतांचीं स्थानें आहेत. एका देवळींत श्रीसाधकनृसिंह (मूर्ती) स्थापना केलेली आहे. हा 'श्रीसाधकनृसिंह' नायक शंखवाळकरांचा मूळ पुरुष जो नायकसाधू, तोच होय. तेथें जवळच अग्रशाळा व पुजारी भटजींचें निवासस्थान आहे. एकंदर या देवस्थानचें वास्तुशिल्प, सभोंवतालची रचना, विहंगम सृष्टीसौंदर्य, गोड आणि औषधी पाण्याचा शुद्ध व स्वच्छ झरा, हें सर्व पाहिल्यावर यात्रेकरूचें मन सुप्रसन्न होऊन समाधान लाभतें.

## पौराणिक आणि ऐतिहासिक माहिती.

गोमांतकांतील वसाहतीच्या आरंभापासून तों हा गोमान्तक प्रांत फिरंगी पोर्तुगीज राज्यसत्तेखालीं येईपर्यंत जो फार मोठा कालावधी लोटला, त्या काळांत हें देवस्थान सासष्टी तालुक्याच्या शंखवाळ गांवांत फार सुप्रसिद्ध आणि पुरातन वैभवांत नांदत आलें असलें पाहिजे याबद्दलचे पुरावे मिळतात. नमुन्यासाठीं उदाहरण म्हणून दाखववायाचें झाल्यास, दोनशें चौसष्ट वर्षांपूर्वी लिहिलेल्या "कोंकणाख्यान" या ग्रंथांत खालील प्रमाणें शंखावली गांवचें पौराणिक वर्णन आढळतें. तें वाचल्यानंतर यथार्थ कल्पना येऊं शकते. (पहाः- अध्याय २ सासष्टी महिमान या प्रकरणातील ओंव्या क्रमांक ४५ ते ५६ पर्यंत).

पांचवा ग्राम शंखावळी । सागर नदी संगम जवळी।
क्षेत्रीं भजनीं तिन्ही स्थळीं । शांता नृसिंह विजयदुर्गा।।४५।।
दैवतांचा महिमा थोर ।। नित्य हरिकथा जागर ।
छत्र चामरें वाद्यें अपार । ऊर्जा सुस्थिर चालते।।४६।।
वाखाणिती क्षेत्र महिमान । नदी सागर संगम म्हणोन।
शंख होताति निर्माण । पुण्य पावन स्थान तें।।४७।।
शंखोत्पत्तीचें स्थान । म्हणोनि शंखावळी अभिधान।

आहे प्रसिद्ध पुरातन । क्षेत्र महिमान तेथीच॥४८॥

ब्राम्हण समुदाय बहुत । सप्त गोत्रींचे असत ।
त्यांमाजी चारी गोत्रींचे तेथ । सांगणें निश्चित ऐका तें ॥४९॥

जमदग्नि वत्सगोत्री एक । भारद्वाज आणि कौशिक।
शंख पिंग कुत्स देख । तिन्ही आणिक आहेती॥५०॥

गोमांचल दक्षिण भागासी । तीर्थराज समीपतेसी।
उत्तम नाम ग्रामासी । नरसिंह लक्ष्मी ते ठायीं॥५१॥

चतुर्वर्ण जन आहेत । चारी आश्रम सेवीत ।
विप्र अग्र-जन्में वसत । वेदांग पाराप्रत पावले॥५२॥

अस्खलित तपो योग बळ । साधनीं भस्म क्रोधानळ।
जेणें करून धर्म प्रबळ । कारणभूत सकळ जगा॥५३॥

तेथें सौभाग्यवती ज्या नारी । त्या पतिव्रता धर्मी तसरी ।
इषुपात रामक्षेत्रा माझारी । नगरी शंखावळी मंडण॥५४॥

जिच्या ठायीं कमलनेत्र कमलापति । वैकुंठाहुनी उतरले क्षितीं ।
भक्तानुग्रहालागुनि सनातन वस्ति । व्हावया मुक्ति जड जीवां ॥५५॥

ज्याचे दर्शनमात्रें करूनी । मोचन होय संसार बंधनीं॥
सुरवरांच्या कार्यालागुनी । जगजीवन त्या ठायीं॥५६॥

परंतु गोमांतकांत फिरंगी पोर्तुगीज ख्रिस्तीधर्मीय लोकांनीं पाय ठेवल्यानंतर (ता. २७ फेब्रुआरी इ. स. १५१० रोजीं तिमोजी नामक चांचाच्या मदतीनें आफोंस दे आल्बुकेर्क या पोर्तुगीज सेनापतीने समुद्रमार्गे अकस्मात छापा घालून प्रारंभीं गोवा शहर हस्तगत करून घेतलें, हें इतिहास सांगतो) त्यांनीं जें ख्रिस्ती धर्म प्रसाराचें मोठें सत्र बळजबरीनें पेटविलें व त्यांत गोवा बेटानंतर सासष्टी प्रांतावरही अत्याचार, जुलूम, छळ व सर्व हिंदुधर्मियांची आहुती पडण्याच्या प्रसंगाचा प्रारंभ अनुभवास आला, व इतरांप्रमाणेंच सासष्टींत सर्वांआधीं कुशस्थली (कुठ्ठाळ) हा गांव गोवा बेटाच्या पैलतीरावर समोरासमोरच असल्यामुळें, या गांवावर हा दुर्धर प्रसंग जलद येणें केवळ संभवनीय नव्हे तर खचितच तांतडीनें ओढवणार, हें जाणून कुशस्थलीकरांनीं प्राणाहून प्रिय असलेल्या आपल्या कुलदैवतासश्रीमंगेश देवास अचानक आणि गुप्तपणें रातोरात फिरंगी राज्य सरहद्दीबाहेर म्हणजे, त्या वेळच्या आदिलशाही राज्यांत, अंत्रुज प्रांतांतील प्रियोळ गांवांत एका वाड्यावर आणून ठेविलें आणि प्रस्तुतच्या प्रशस्त व आल्हाददायक ठिकाणीं त्या दैवताची स्थापना केली. कुशस्थली (कुठ्ठाळ) गांवावरच हा दुर्धर प्रसंग जलद येणेची कांहीशी खात्री होती. याचें मुख्य कारण, त्या काळीं गोवाबेट्ट म्हणजे आजचे तिसवाडी, याची सीमा आजच्या आगशी गांवापर्यंत संपत होती व तो आगशी गांव जुवारी नदीच्या त्या काळीं अघनाशिनी नांवानें ओळखत असलेल्या नदीच्या तीरावर होता आणि त्या आगशी गांवा समोरासमोर त्याच नदीच्या पैलतीरावर कुशस्थली हा गांव असल्यामुळें, या दुर्धर प्रसंगाची धास्ती त्या गांवास जास्त होती. तसेंच, कुशस्थली गांवांत त्या काळीं ज्या जागीं श्रीमंगेशाचें देवालय होतें, त्या देवालयाकडे जाण्याच्या रस्त्याच्या उजव्या बाजूकडे त्याच रस्त्याचा एक फांटा जातो, त्या फांट्यापासून अगदीं जवळच्या अंतरावरच सांखवाळ (शंखावली) गांवांत सांतेरी, ईश्वर, गांवपुरुष, नारायण, भगवती, विजयदुर्गा, नरसु व परमदेव दैवतांचीं देवालयें होतीं. स्पष्ट कल्पना वाचकांसाठीं देण्यासाठीं म्हणून सांगावयाचें झाल्यास, वस्तुस्थिती प्रत्यक्षांत अशी होती कीं, कुठ्ठाळ गांवांत जराशा उंचवट्याच्या भागावर असलेल्या श्रीमंगेश देवालयाच्या इमारतीपासून ज्या स्थानावर सांखवाळ गांवच्या सरहद्दींत त्या गांवचें देवस्थान होतें, तें पाहिल्यावर दोनही कडील देवस्थानें एकाच गांवांतील असावींत, असें कोणासही परकी प्रवासी इसमास, ज्यास स्थानिक ग्रामीण विभागीय ते दोन वेगवेगळे गांव आहेत आणि त्यांमधील त्या एकमेकांची सीमा अमुक जागेपर्यंत आहे, हें माहीत नाहीं, त्यांस खचित वाटल्यास नवल नव्हे, इतकीं तीं जवळ आसपासच्या क्षेत्रांत होतीं व कुठ्ठाळ आणि शंखावळी या दोन गांवांत प्राचीन कालापासून सीमावाद सतत चालत आलेला होता. इतकें सविस्तरपणें सांगण्याचें कारण एवढेंच कीं, हे दोन गांव एकमेकांच्या फार जवळ व सीमेवर असल्यामुळें एका गांवांत साधारणपणें खट्ट झालें, तर शेजारच्या शंखवाळ गांवांत त्याचा आवाज लगेच समजूं शके. आणि यामुळें कुठ्ठाळ गांवावर कांहीं संकट आलें किंवा तेथें थोडीशी हालचाल जरी झाली, तरी ती आपोआप सहजासहजीं शंखवाळ गावांत लगेच

अविलंबें कळत असे. आणि या अशा परिस्थितीमुळें ज्या काळीं कुठ्ठाळ गावांतील जनतेस आपल्या दैवतांवर बाटाबाटीचा, मूर्ती भंजनाचा दुर्धर प्रसंग फारच जवळ आल्याची चाहूल लागली, म्हणून त्यांनीं अचानक आणि आकस्मिकपणें रातोरात आपल्या दैवतांचें स्थलांतर कुठ्ठाळ गांवाबाहेर आदिलशाहीच्या फोंडा प्रांतांत प्रियोळ गांवांत केलें, त्या स्थलांतराची बातमी आणि कारणें त्या कुठ्ठाळ गांवच्या देवालयापासून अवघ्याच अंतरावर असलेल्या शंखवाळच्या तत्कालीन देवालयाच्या व्यवस्थापकांस आणि तेथील कुळावी महाजनांस तत्काल अविलंबें कळल्याशिवाय राहिलीं नसावींत असें मानणें मोठ्या धाष्टर्याचेंच नव्हे, तर अविचारी आणि मूर्खपणाचें ठरेल कीं नाहीं हें वाचकांनींच आपापल्या मनाशीं सारासार बुद्धीचा वापर करून व्यवहार्यपणें ठरविणें प्राणाणिकपणाचें ठरेल. ज्या काळीं, कुठ्ठाळच्या ग्रामवासियांनीं, आपलें कुलदैवत या महान भयानक अवस्थेंत कुठ्ठाळीं गांवांतून तांतडीनें अचानकपणें हलवून स्थलांतर केलें, त्याच काळीं त्या गांवच्या सीमेवरील आसपासच्या देवस्थानांतील दैवतें खचितच स्थलांतर करून पोर्तुगीज राज्य सरहद्दीबाहेर संबंधित कुळावी लोकांनीं नेलीं असलीं पाहिजेत, हें उघड आहे. आणि त्यास अनुसरून शंखवाळीचें श्रीविजयादुर्गा दैवत फोंडें प्रांतांतील केरी येथें, श्रीसांतेरी, जिला नंतरच्या काळांत श्रीशांतादुर्गा म्हणूं लागले, तें दैवत त्याच फोंडें प्रांतांतील गोठण येथें, आणि श्रीनरसू, आतांचा श्रीलक्ष्मीनृसिंह, थेट आतां ज्या वेलिंग गावांत स्थापित आहे, तेथें न येतां, जुवारी नदीपलीकडे मडकई गांव आहे, त्या गांवच्या नदीकिनाऱ्यावरच्या एका करंजाळ नामक वाड्यावर एका जागेंत स्थलांतर करून राहिला. ही जागा करंजाळ येथील 'फडते' उपनांवाच्या कुटुंबाच्या मालकीची होती, ती त्या कुटुंबाने मोठ्या आदराने आणि भक्तिभावाने त्या देवाच्या मुक्कामास तत्परतेनें आणि आनंदाने दिली. या वाड्यावर बहुसंख्य लोकवस्ती मच्छिमारांची असून, त्या लोकांनीं या दैवताचें स्वागत मोठ्या हर्षभरितेनें केलें. श्रीदेव नृसिंहानें या करंजाळ वाड्यावर अल्प मुक्काम केला व नंतर सध्याच्या वेलिंग गावांत सुयोग्य जागीं या दैवताची स्थापना करण्यांत आली.

करंजाळ वाड्यावरील ज्या 'फडते' उपनांवाच्या कुटुंबानें त्याकाळीं, श्रीनृसिंह दैवतास भक्तिभावानें आपली जागा मुक्कामास दिली, त्या कुटुंबाच्या वंशजांस त्या काळापासून आजपर्यंत अव्याहतपणें वेलिंग येथें देवस्थानांत प्रतिवर्षीं महापर्वणी महोत्सव जत्रा कार्तिक शुक्ल १४ शी वैकुंठ चतुर्दशीच्या दिवसापासून पांच दिवस साजरी होत असते, त्या महोत्सवांत, तेथील ठराविक वडाच्या पारावर नेऊन त्यांचा बहुमान पूर्वापार चालीरितीप्रमाणें केला जातो आणि अशा रितीनें कृतज्ञता व्यक्त केली जाते. धन्य तें करंजाळचें 'फडते' उपनांवाचें भाविक कुटुंब आणि धन्य ते कुळावी महाजन त्या श्रीलक्ष्मी-नृसिंह दैवताचे.

शंखवाळ गांवांतील दैवतांचें स्थलांतर, ज्या काळीं शेजारच्या कुशस्थली गांवांतील दैवताचें स्थलांतर झालें, त्याच काळीं झालें, असलेंच पाहिजे हें न सांगतांही समजणें कठीण नाहीं. याची सविस्तरपणें कारणें पुढें समजून घेऊं. आतां तें स्थलांतर कोणत्या सालीं झालें हें सिद्ध करणारे कोणते स्पष्ट पुरावे गतेतिहासांत सांपडतात तें पाहूं.

ख्रिस्ती धर्मीय जेझुइत पाद्री लोकांनीं सासष्टी तालुक्यांत स्वधर्मप्रसारार्थ प्रथमतःच जो पाय ठेविला तो इसवी सन १५६० सालींच, या बद्दल सर्व इतिहासकारांचें एकमत आहे. कारण, ती घटनाच उघड आणि राजरोसपणें पोर्तुगीज सरकारी आरमारी मदतीसह घडली. इ. स. १५६० सालीं, गास्पार नांवाचा पाद्री गोव्यांत मुख्य ख्रिस्ती धर्मोपदेशक झाला. त्या पाद्रीनें गोवा बेटांतील गोवा शहरांत, सासष्टी तालुक्यांतील बरेच हिंदु लोक केवळ व्यापाराच्या उद्देशानें आल्याचें पाहून अचानकपणें एकाच दिवसांत त्यांतील चारशें लोकांस पकडून त्यांस बळजबरीनें ख्रिस्ती धर्माची दिक्षा दिली! ही दिक्षा 'सां पावलु' कॉलेजच्या इमारतींत इथियोपियाचा बिशप आणि मालाकचा बिशप यांच्या उपस्थितींत, उल्लेखित दों गास्पार, गोव्याचा पहिला आर्चबिशप यानें दिली. या बद्दलचा उल्लेख 'ओरियेंत कोंकिस्तादु' या ग्रंथांत (पहाः- भाग पहिला, कोंकिस्त १ दिव्हिजांव २, पृष्ट १०१, आवृत्ती १८८१ सालीं मुंबई येथें एक्झामिनर छापखान्यांत छापलेली) वाचावयास मिळतो. व याच घटनेमुळें ख्रिस्ती धर्मप्रसाराचा ओनामा किंवा प्रवेश सासष्टी प्रांताच्या जनतेंत झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. पुढें या पाद्री लोकांनीं सबंध सासष्टी प्रांत बाटविण्याची आपली इच्छा धरून तसें करण्याबद्दल सरकारी मंजुरी मागविली. सरकारनें त्या कृत्यास मंजुरी पूर्णपणें तर दिलीच, पण शिवाय त्यांच्या मदतीस आरमारही दिलें. अशा तयारीनें प्रत्यक्ष सासष्टी प्रांतावर आक्रमण करावयाचें तर तें आरमाराच्या मदतीसह म्हणजे सासष्टी प्रांताच्या ज्या सीमेस नदी आहे, त्या बाजूनेंच व्हावयास हवें, हें उघड आहे. ही सीमा म्हणजे त्या कालची गोवा बेटाची दक्षिण

बाजू, ज्या बाजूस किंवा सीमेस अघनाशिनी नदी किंवा जुवारी नदी या नांवानें ओळखिली जाते ती. ही नदी मुरगांवकडे जाऊन समुद्रास मिळते. त्या कालीं मुरगांव पासून सासष्टी प्रांताची सीमा जलमय व मुरगांवपासून कुठ्ठाळपर्यंत सासष्टी प्रांताच्या उत्तर सीमेचा किनारा, पैलतीरावर गोवा बेटाचा किनारा आणि गोवाबेट व सासष्टी प्रांताची उत्तर सीमा यांमध्यें आगशीची नदी किंवा जुवारी नदी म्हणजे अघनाशिनी नदी असल्यामुळें जलमार्गानेंच आरमारासह हल्ला किंवा आक्रमण सासष्टीवर येणार, असें निश्चित झाल्यावर या संग्राम मोर्चाचा रोख सुरवातीस कुठ्ठाळ गांवावरच येणार हें सर्वांनाच निःसंशयपणें समजून चुकलें. याचें मुख्य कारण, गोवा बेटाच्या समोर पैलतीरावर जें गांव आहे, तें कुठ्ठाळ; गोवा बेट आणि कुठ्ठाळ यांमध्यें अघनाशिनी नदी. शिवाय या झेझुइत पाद्री व पोर्तुगीज लोकांकडून सासष्टी प्रांतावर पूर्व व दक्षिण बाजूंच्या सीमांवरून प्रवेश होणें पूर्णपणें अशक्यच होतें. कारण, या दोन्ही बाजूंनीं परकीय राज्य असल्यामुळें या पाद्री व पोर्तुगीज लोकांस तेथें शिरकाव होणें कठीण होतें. पोर्तुगीज सरकारी कुमक घेऊन ख्रिस्ती धर्म प्रसाराचें व्रत स्वीकारलेलें पाद्रीमंडळ गोवा बेटांतील हिंदु धर्मीय लोकांस बळजबरीनें एकसारखें बाटवीत चाललें होतें. हिंदुधर्मीय लोकांवर हा महान् दुर्धर प्रसंग ओढवला, तेव्हां त्या लोकांनीं आपली मालमत्ता, शेतीवाडी, घरेंदारें, सर्व सोडून जीव मुठींत धरून आपल्या हिंदुधर्म रक्षणासाठीं आपापला प्रांत सोडून पोर्तुगीज हद्दीबाहेर जाणें भाग झालें होतें. त्याच बेतांत ते होते. इतिहासांत हा काल अत्यंत ऱ्हदयद्रावक रितीने वर्णिलेला आढळतो. कित्येकांनीं अगतिक होऊन मरण पत्करलें. ख्रिस्ती धर्माचा प्रचार करतांना हें पाद्रीमंडळ हिंदुधर्मीय जनतेचे अनन्वित छळ व हालहाल करीत. देवालयें जाळून किंवा मोडून टाकणें, मूर्ती फोडणें, संपत्तीची लुटालूट किंवा नाश करणें, वगैरे अनन्वित कृत्यें करणारी ती मंडळी तशीं कृत्यें करीत. गोवा बेटांत जसजशी एकामागून एक गांवें जाऊं लागलीं होतीं, व आतां सासष्टी प्रांतावर पाय ठेवण्याच्या तयारींत आहे असें जेव्हां समजलें, तेव्हां आतां ही मंडळी लगेच कुठ्ठाळ गावांत पोचणार या परिस्थितीची कल्पना व धोका कुठ्ठाळ गांवच्या जनतेस उमजून चुकला आणि त्या जनतेनें प्रसंग ओळखून आपल्या कुलदैवताकडे शरण येऊन गाऱ्हाणें घालून व प्रार्थना करून, त्यांनीं त्या दैवतास रातोरात पळवून, नदी ओलांडून, फोंडा प्रांताच्या प्रियोळ गांवीं स्थलांतर केल्याचा उल्लेख मागें दिला असल्यामुळें हें स्थलांतर कोणत्या सालीं झालें, याचे पुरावे सरकारी दप्तरांत किंवा झेजुइट पाद्री मंडळानें हीं कृत्यें केलीं होतीं, त्यांच्या त्या काळच्या पत्रसंग्रहावरून व इतर पुराव्यांबद्दल जें कांहीं स्पष्ट आणि निःसंशयपणें सिध्द होतें, त्याचाच शोध घेऊं. कारण, एकदां हें पाद्रीमंडळ, बरोबर कोणत्या सालीं, कोणत्या दिवशीं, कुठ्ठाळीस प्रथमच आलें, याची माहिती मिळतांच, आणि त्यांस तेथें काय परिस्थिती आढळली हें कळतांच, शेजारच्या शंखवाळ गांवची मोहीम त्यांनीं केव्हां केली, याचा पुरावा निदान अंदाज करणेस तरी सुलभ होईल म्हणूनच प्रारंभीं नदी किनाऱ्यावर असलेल्या कुठ्ठाळ गांवांतील त्यांच्या प्रथम प्रवेशाबद्दल काय माहिती मिळते तें पाहूं. कारण शंखवाळ गांवांत कुठ्ठाळहून जावयाचें असतें. त्या झेजुइट पाद्री मंडळानें त्या काळीं गोव्याहून पोर्तुगालास जीं गुप्त पत्रें पाठविलीं होतीं, तो सर्व पत्रसंग्रह लिस्बन शहरांत एकत्र करून त्यांत त्या वेळच्या गोव्याच्या सरकारी दप्तरांतील अनेक घटना समाविष्ट करून 'कोंपाजीय दे झेझूसचा समग्र इतिहास' ह्या कोंपाजीस दे झेजूसच्या पाद्री लोकांनीं पोर्तुगालची राजधानी लिस्बन शहर येथें "ओरियेंति कोंकिस्तादु" या नांवाचा मोठा ग्रंथ इ. स. १७१० सालीं त्यावेळच्या पोर्तुगीज राजघराण्याचा जो छापखानदार श्री. व्हालेंति दा कोस्त दिस्लांदिस याकडून प्रसिद्ध केलेला आहे, त्या ग्रंथांत विशेषतः ज्या पाद्री इसमांनीं सासष्टी प्रांतांतील कुठ्ठाळ गावांत प्रथमतःच प्रवेश केला होता, त्याच पाद्री इसमांचीं तपशीलवार कृत्यें त्यांत सविस्तर प्रकारें त्यावेळच्या माहितीपूर्ण पत्रांवरून पूर्णपणें लक्षांत येतात. 'ओरियेंति कोंकिस्तादु' ह्या ऐतिहासिक ग्रंथाच्या पहिल्या भागांत इ. स. १४९८ ते १५६३ व दुसऱ्या भागांत इ. स. १५६४ ते १५८५ पर्यंतच्या कालांत ज्या ज्या घटना त्यावेळीं कोंपाजीय दे झेझुसच्या पाद्री मंडळानें घडवून आणल्या, त्यांचा सगळा वृत्तांत त्यांत आहे. त्या ग्रंथाच्या पहिल्या भागाच्या पृष्ट १६९ वर जो मजकूर आहे, तो जशाचा तसा, त्याच भाषेंत, त्याच लिपींत खालीं कॉपी करून दिला आहेः-

**"Da ilha de Goa naveguemos mais ao Sul passemos a terra firme de Salcete na qual ao primeiro de Maio deste anno em que andamos de mil quinhentos & sessenta, entrarao com felicissimo auspicio os primeiros Missionarios de Companhia o Padre Pedro Mascarenhas e o Irmao Manuel Gomes mandados pelo Padre**

Provincial Antonio de Quadros a instancia do Viso-Rey D. Constantino de Braganca. Dista a ponta mais Setentrional de Salcete, onde esta a fortaleza de Mormugao de ponta de Nossa Senhora de Cabo, a mais Occidental de Goa, o espaco de hum braco de mar, que com a boa mare se atravessa em meia hora.....''त्याचें भाषांतर असें:-

"आम्हीं गोवा बेटाच्या दाक्षिण बाजूस जलप्रवासानें सासष्टीकडे चाललों. जेथें ता. १ मे १५६० रोजीं पहिलेच मिशनरी कंपनीचे पाद्र पेद्रु मास्कारेंजस आणि त्याचा सोबती मानुयेल गोमिस या दोगांनीं समाधान पूर्वक पाय ठेविला. हे दोघे, पाद्रि मास्कारेंजस आणि मानुयेल गोमिस यांस पाद्रि प्रोव्हिंसीयाल (पाद्री वरिष्ट अधिकारी) आंतोनियु दे क्वाद्रुस यानें व्हिस्सु रै दों कोंस्तांतिनु दे ब्रागांस ह्यांच्या आग्रहावरून पाठविलें होतें. सासष्टीचें दक्षिण दिशेचें शेवटचें टोंक, जिथें मुरगांवचा किल्ला आहे, तें नोस्स सिंजोर दे काबु टोंकापासून म्हणजे गोवा बेटाच्या पश्चिम टोंकापासून मध्यंतरी समुद्राचा फांटा व तो पाण्याचा प्रवाह अनुकूल असल्यास, अवघ्या अर्ध्या तासांत ओलांडतां येईल."

या पुराव्यावरून सिद्ध झालें कीं, तें पाद्रीमंडळ जें धर्मप्रसारार्थ गेलें होतें, त्या पाद्रीमंडळानें ता. १ मे १५६० रोजीं पहिल्यानेंच सासष्टीच्या भूमीवर (कुठ्ठाळच्या तीरावर) पाय ठेविला. आतां यापुढें यापेक्षां जास्त महत्त्वाचा पुरावा कोठें मिळतो काय, याचा शोध घेण्याचा प्रयत्न करूं.

Monumenta Historica Socielatis Iesu -Documenta Indica, Edit -Ioseph Wicki S. T. (Vol. VII) 1566-1569 Romae - Apud Monumenta Historica Soc. Iesu. Via Dei Penitenzierizo -1962. हा अत्यंत महत्त्वाचा मोठा ग्रंथ रोम शहरांत छापलेला असून त्या ग्रंथाचे बरेच कांहीं भाग आहेत. हा ग्रंथ म्हणजे मिशनरी दे जेझुसच्या समग्र इतिहासाचा भक्कम पुरावाच मानला जातो. त्या ग्रंथांत सोसियेदाद दे जेझुसच्या पाद्री मंडळानें आपल्या सुरवाती पासून शेवटपर्यंत ज्या ज्या भूमींत पाय ठेविले, जीं जीं कृत्यें केलीं, ज्या ज्या घटना घडविल्या, त्या सर्वांची तारीख, महिना, सन, जागा, वगैरे बारीक सारीक नोंदींसह साद्यंत रिपोर्ट लिहून त्या पाद्री मंडळाच्या रेक्टरनें किंवा रेक्टरच्या हुकुमानुसार व परवानगीनें कार्यकर्त्या दुसऱ्या पाद्रीनें गोव्याहून पोर्तुगालास जीं पत्रें त्या कालीं पाठविलीं होतीं, तो सर्व अस्सल पत्रसंग्रह या ग्रंथांत छापलेला आहे. या ग्रंथाच्या भाग ७ वा, पृष्ट ६३ वर मार्जीन नंबर ७४५ वर जो मजकूर आहे तो असा आहे:-

"Tem ja levados alguns escondidamente (283r) para outras terras, deixando as casas desemparadas. Os nossos Padre pediram huma casa, de um destes pagodes que se levarao, para mella fazerem uma Igreja por estar em muyto bom lugar, para isso a sua senhoria a concedeu (e) juntamente a renda que o pagode tinha para a fabrica de Igreja..." (Este trecho e de pagina 63 do documento numero 16 datado de 29 de Novembro de 1566, isto e, da carta escrita pelo Gomes Vaz por commissao dop. Reytor Antonio da Costa do Colegio do S. Paulo de Goa, publicada desde pagina 38 a pagina 71 do Documenta Indica edidit Ioseph Wicki S. T. Vol. VII, 1566-1569. Impresso em Roma em 1962 por Apud Monumenta Historica Soe. Iesu. Via Dei Penitenzieri")याचें भाषांतर असें आहे:-

"यापूर्वीच कांहीं (देव) लपवून दुसऱ्या राज्यांत हद्दींत नेले असून त्यांचीं देवालयें निराधार स्थितींत ठेविलीं आहेत. आमच्या पाद्रींनीं त्यांतील एका देवालयाच्या इमारतीची मागणी केली; कारण, त्या इमारतींत चर्च स्थापन करण्याचें योजिलें. ती इमारत चर्चसाठीं वापरण्यास सरकारनें मंजुरी तर दिलीच, पण त्याच बरोबर देवालयास जें उत्पन्न होतें, तेंही चर्चच्या भोगवटयासाठीं बहाल केलें..."

हा मजकूर पाद्रि गोमिस व्हाज यानें सां पावलु कॉलेज, गोव्याचे रेक्टर पाद्रि आंतोनियु दे कोस्त यांच्यातर्फे सही करून गोव्याहून ता. २९ नवंबर १५६६ रोजीं जें पत्र लिहिलें- (म्हणजे दाखला नंबर १६) त्या पत्रांतील असून, तें समग्र पत्र पृष्ट ३८ ते ७१ पर्यंत भाग ७ वा 'दोकुमेंत इंदिका' या ग्रंथांत छापलेलें आहे.

वरील देव व देवालयाची इमारत कुठ्ठाळ येथील श्रीमंगेशदेव व त्याच्या देवालयाची असल्याचा उल्लेख पृष्ठ ६५ मार्जीन नंबर ७६५ वर त्याच ग्रंथांत आहे. पण, तो सर्व मजकूर येथें विस्तारभयास्तव जागेच्या अभावीं देणें अशक्य आहे. जिज्ञासूंनीं तो ग्रंथ वाचून पाहिल्यास सत्यता पटेल.

वरील सर्व पुरावे पाहून अभ्यासू इसमास तरी मुळींच

शंका उरत नाहीं कीं, जेझुइट पाद्री मंडळ आरमारासह सासष्टींत धर्म प्रसारासाठीं जें गेलें व त्यानें त्या भूमीवर प्रथमच पाय ठेविला, तो दिवस म्हणजे तारीख १ मे १५६०, आणि त्या दिवशीं कुठ्ठाळींत प्रवेश केल्यानंतर तेथील श्रीमंगेश देवाच्या देवालयांत जाउन पहातां, त्या पाद्री मंडळास आढळून आलें कीं, त्या इमारतींत देव नव्हता. त्या देवालयाची इमारत देवाविना रिकामी होती व त्या दिवसापूर्वीं केव्हांतरी तेथील देव लपवून दुसऱ्या राज्यांत नेल्याचें त्या पाद्री मंडळास तेथें कळलें आणि ती रिकामी इमारत त्या पाद्री मंडळानें चर्च स्थापण्यासाठीं सरकारकडे मागितली व सरकारनें ती इमारत तर दिलीच, पण त्याच बरोबर त्या देवालयाच्या उत्पन्नाच्या जमिनीही त्या भावी चर्चसाठीं सरकारनें सुपूर्द केल्या!

हे पुरावे पाहून असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, जर ता. १ मे १५६० दिवसापूर्वीं कुठ्ठाळ गांवच्या देवालयांतील देव त्याच्या कुळावी लोकांनीं लपवून दुसऱ्या राज्यांत नेल्याचें स्पश्ट आणि निःसंशयपणें सिद्ध होतें, कारण, प्रत्यक्ष जेझुइट पंथाचें पाद्रीमंडळ आपल्या तत्कालीन पत्रव्यवहारांत नमूद करतें, तर त्याच कुठ्ठाळ गांवच्या सीमेजवळ असलेल्या शंखवाळ गावांतील देवस्थानच्या कुळाव्यांनीं त्या देवस्थानांतील आपलीं दैवतें जीं शंखवाळ गांवाबाहेर स्थलांतर करून नेलीं आहेत, तीं ता. १ मे १५६० दिवसापूर्वीं म्हणजे जेझुइट पाद्रीमंडळ त्या कुठ्ठाळ गावांत प्रवेश करण्यापूर्वीच, बाटाबाटीच्या आणि मूर्ती भंजनाच्या भयानें स्थलांतर करून खचित गेलीं असलीं पाहिजेत, याबद्दल आणखी शंका, संशयास जागा आहे, असें मानण्याचें कारण नाहीं. कारण इश्टपक्षीं तीं दैवतें शंखवाळ गावांत तशींच असतीं तर, तीं परत त्या दैवतांच्या कुळावी महाजनांस बाटाबाटी आणि भंजनाशिवाय मिळालीं असतीं काय? मग स्थलांतर केलेलीं दैवते, त्या तारखेपूर्वीच तेथून हलविलीं गेलीं असलीं पाहिजेत हें उघडच दिसतें यांत आणखी शंका येण्याचेंही कारण नाहीं. त्या स्थलांतराबद्दल 'कोंकणाख्यान' या ग्रंथांत जो उल्लेख आहे, तोही वाचकांपुढें ठेविल्यास त्यामुळें योग्य तो बोध होण्यास मदत होईल म्हणून तोही खाली दिला आहे.

'कोंकणाख्यान' हा ग्रंथ शके १६४३ पूर्व नाम संवत्सर म्हणजे इ. स. १७२१ सालीं लिहिलेला आहे. या ग्रंथ निर्मितीस आज २६४ वर्षें उलटलीं आहेत. या अडीच शतकांपेक्षां जास्त वर्षें झालेल्या ग्रंथांत 'दैवतांचें स्थलांतर' या प्रकरणांत त्या ग्रंथ निर्मात्यानें काय लिहून ठेविलें आहे याची माहिती घेतल्यास मोठी उद्बोधक ठरूं शकेल. पहा, अध्याय ८ वाः-

श्रीगणेशाय नमः ॥ ऐसें असतां यानंतर ॥ विघ्न उदेलें महाथोर ॥
द्वीपांतीचें म्लेंच्छ टोपीकर ॥ गोमांचल नगरीं प्रवेशले॥१॥
देशामाजी मुख्य नगर ॥ गोमांचल क्षेत्र अति पवित्र॥
तेथें पातले अपवित्र ॥ पीडा अपार पैं केली॥२॥
पीडा आरंभिली नानापरी ॥ उत्पात केले महाघोरी॥
मग देव क्षेत्रा बाहेरी ॥ परतीरीं प्रवेशले ॥३॥
सासष्टीचे तीसवाडीचे देव ॥ आणि बारदेशाचे सर्व॥
कोणेस्थळीं गेले तो ठाव ॥ सांगेन निर्वाह सर्व पैं॥४॥
सासष्टी देशामाजी वाहिले ॥ म्हाडगांवीचे देव रिवणास आले ॥
कुडतरी ग्रामीचे पातले ॥ चंद्रवाडी वेळणासी॥५॥
कुशस्थळी श्रीमंगेश प्रियोळीं ॥ वेरणे म्हाळसा म्हाडदोळीं ॥
शंखावळी देव दोन्ही स्थळीं ॥ केरी आणि वेलिंगासी॥६॥
वेलिंगासी नरसिंह सांतेरी ॥ विजयदुर्गा ते केरी माझारी ॥
आणि केळोशींची शांतादुर्गा बरी ॥ ती राहिली कवळें ग्रामी ॥७॥

वरील सर्व माहितीचे अभ्यासपूर्वक, बारकाईनें निरिक्षण करणारास शंकाच रहात नाहीं कीं, क्रमांक ६ आणि ७ व्या ओंव्यांत कथिल्याप्रमाणें शंखावली गावांतील देव त्या देवाच्या कुळाव्यांनीं स्थलांतर करून केरी आणि वेलिंग या दोन गावांत नेले आहेत आणि हें स्थलांतर इसवी सन १५६० तारीख १ मे पूर्वीं बाटाबाटीच्या आणि मूर्ती भंजनाच्या भयानें, आपल्या शेजारी कुठ्ठाळ येथील श्रीमंगेश देवाच्या कुळाव्यांनीं ज्याप्रमाणें प्रसंग ओळखून आपला कुलदेव कुठ्ठाळहून अचानक आणि आकस्मिकपणें रातोरात पळवून अंत्रुज-फोंडा प्रांतात प्रियोळ गावीं नेला, त्याच प्रमाणें, अंत्रुज-फोंडा प्रांतांत स्थलांतर करून नेले असले पाहिजेत याची खात्री पटते.

वरील विवेचनावरून कुड्ळ आणि शंखवाळ परिसरांतील देवालयांतील प्रमुख दैवतें तत्कालीन राजसत्तेच्या सरहद्दीबाहेर लपवून छपवून, गुप्तपणें आकस्मिक रित्या, काळोख- अंधाराच्या आश्रयांत, त्या दैवतांच्या कुळावी महाजनांनी स्थलांतर करून नेलीं असल्याचें सिद्ध झालें, पण, मुद्दाम एक गोष्ट व्यवहार्यपणें लक्षांत घेणें अत्यावश्यक आहे आणि ती ही कीं, तें स्थलांतर ज्या भयानक प्रसंगांत करणें प्राप्त झालें, तें करताना तें करणाऱ्यांच्या जिवावरचा, जीवनमरणाचा पूर्ण धोका पत्करूनच तें त्यानीं केलें. कारण, तें स्थलांतर करताना दैववशात् त्यांस वाटेंत धर्मवडे, जुलमानें बाटाबाटी करून जेझुइट पंथाचे लोक मूर्तीभंजन करणारे, जेझुईट जर भेटले, तर मरण ओढवणार; शिवाय, मूर्तिभंजन तर नक्कीच. यासाठीं, तें स्थलांतर करतांना मुख्य दैवताचें प्रतिक लिंग, किंवा लपवून छपवून नेण्यासारखी धातूची किंवा पाषाणी अगदी लहान मूर्ती बरोबर घेऊनच तें स्थलांतर कसें तरी तडीस नेणें हें अपरिहार्य होतें हें समजूं शकतें म्हणून, अशाच प्रकारें दैवतांचें स्थलांतर त्या प्रसंगीं झालें हें उघड आहे. कारण, प्रत्येक देवालयांत प्रमुख पंचायतन किंवा आणखी दैवतांच्या ज्या मोठमोठ्या पाषाणी जड वजनी मूर्ती होत्या त्या तेथून हलविणें आणि त्या उभारून तेथून दुसऱ्या राज्यांत लांब नेणें हें काम सहजासहजीं एका इसमाच्या किंवा दोन इसमांच्या शक्तीबाहरचें तर आहेच, व वजनी पाषाणा मूर्ती घेऊन रात्रीच्या काळोख-अंधारांत धांवत पळत जाणें तर अशक्यच, म्हणून त्या तशा वजनी मूर्ती आणि त्या देवालयांच्या इमारती जागच्या जागीं राहिल्या. आपलें दैवत प्राणापलीकडे मानून ज्यांनीं बाटाबाटीच्या भयानें जिवावरचा धोका पत्करून तें दैवत दुसऱ्या राज्यांत स्थलांतर करून नेलें, तेच कुळावी महाजन आपल्यामागें येथें राहिलेल्या देवालयांच्या इमारती व त्यांत असलेल्या पाषाणी मूर्ती मोडून आपल्याच हातांनीं नामशेष करणें कसेंच शक्य नव्हतें. म्हणून, आपल्या पश्चात् काय होईल तें होवो, त्यास कोणाचा इलाज नाहीं असें मनांत आणून मोठ्या दुःखित अंतःकरणानें सर्वस्वावर तिलांजली देवून ते स्थलांतर करणारे आपल्या बरोबर आपलें मुख्य प्रमुख दैवत घेऊन पोर्तुगीज सरहद्दीबाहेर गेले. त्यांच्यामागें येथें जेझुइट पंथाचे लोक जे प्रत्येक गावांत फिरून तेथील दैवतांची व देवालयांची, इमारतींची मोडतोड, मूर्तीभंजन, लोकांची बळजबरीनें बाटाबाटी करीत असत. त्यांचा हा अत्याचार आणि धुमाकूळ चालूच होता आणि असा हा कार्यक्रम ते नित्य करीत असत.

शंखवाळ गावांतील देवालयांच्या इमारतींस दैवतांच्या स्थलांतरानंतर त्यानीं तशाच आगी लावल्या, इमारती संपूर्णपणें तोडून उध्वस्त केल्या, याबद्दलचा सविस्तर माहितीसहीत साघंत वृत्तांत फ्रै. गोमिस व्हाज तें दुष्कृत्य करणाऱ्या जेझुइट पंथाच्या पाद्री अधिकाऱ्यानेंच आपल्या ता. १७ मार्च १५६७ च्या एका पत्रांत आपण केलेल्या कृत्यांचा रिपोर्ट आपल्या वरिष्ठांस सादर करतांना दिलेला आढळतो. हीं पत्रें त्याकालीं फार गुप्त होतीं. पण, आतां चारशें वर्षांच्या दीर्घ कालानंतर त्या सर्व पत्रांचा, रिपोर्टाचा समावेश जशाचा तसा, तत्कालीन ऐतिहासिक घटनांचा एक इतिहास ग्रंथ, मोठा प्रचंड, इटालीच्या रोम शहरांत छापलेला आहे. त्या ग्रंथाच्या भाग ७ वा, (इसवी सन १५६६-१५९९) पृष्ट ३९२-३९३ - नंबर ९० Fp. Gomes Vaz, S.T.P. (LEOnI HENRIQUES S.I.) ET SOCIEIS (LUSITANIE) Goa 12 Dezembro de 1567मध्यें जें पत्र आहे, त्या पत्रावरील अत्यावश्यक, कल्पना येण्यापुरता, शंखवाळ गांवच्या देवालयांसंबंधांत जो मजकूर आहे, तोच खालीं दिलेला असून, त्यापुढें त्या मजकुराचें संक्षिप्तांत मराठी भाषेंत भाषांतर करून दिलें आहे. याचें कारण, तो मजकूर मूळ पोर्तुगीज भाषेंत आहे. व वाचकांस- ती भाषा न समजणारांस, भाषांतरामुळें वस्तुस्थितीची माहिती होऊं शकेल.

Documenta Indica. Vol. VII. Pagina 392-393.

600)-50 Oje 2a feira 17 dias do mes de Marco estando na minha fortaleza 'as tres horas da meya noite nao podendo dormir com muitas ocasioes que me desenquietavam determinei de empregar este dia a esta 4o da noite da maneira que na outra vida me nao fosse pedido conta de ociosidade.

Embarquei com determinacao de ir a ver a V. R. a esse nova igreja de S. Philippe e tanto que o nao achei determinei de empregar este dia em louvor da morte a paixao de Christo N. Senhor. Fui-me pela aldeia de Sanquoali e como tenha guerra campal com os diabos, a comecei com o desejo que trazia de servir a Deos N. Senhor. E por achar pequenas forscas no diabo a em mim grande esforco com os companheiros que trazia sossobramos o primeiro paguode que

esta a par do bandel de Sanqoali e o paguode Daro e o outro Pormando e outro Narana e outro Baguonti e Hesporo, e Ajocini e Chrasta cemai de maneira que o surieantes ficaram tas, que delles a fogo e delles a ferro, fica V. R. satisfeito da afronta que diz que ficarao, e a igreja desafrontada de roins vezinhos.

51-O paguode grande de Sanquoalli que se chama Cantari tem boa madeira e perto de mar; sua senhoria a pode dar ao bem-aventurado S. Lourenco. Pode dar por nova aos Padres do Colegio que de quatro partes dos paguodes destas terras as tres sao ja ou feitas em poo ou derribadas. Fico pera servir a V. R. como seu. Aos 17 dias do mes de Marco de 1567. वरील पोर्तुगीज भाषेंतील मजकुराचें संक्षिप्त भाषांतरः-

"आज सोमवार ता. १७ मार्च, मीं किल्ल्यांत असताना मध्यरात्रौ ३ वाजतां मला या पूर्वीच्या अनेक प्रसंगांप्रमाणें, शांतपणें झोंप घेणें शक्यच नव्हतें. कारण, या दिवसाच्या रात्रीचा चवथा भाग, मला ही वेळ रिकामटेकडेपणांत घालविल्याचें पाप या जन्मांत करून त्याचें प्रायश्चित्त मला पुढच्या जन्मांत भोगावें लागेल याबद्दलची अस्वस्थता मनाला वाटत होती. म्हणून, मीं सां फिलीपचें चर्च (हें चर्च म्हणजे कुठ्ठाळ गांवचें, वाचकांच्या माहितीसाठीं कळवीत आहें.) पाहाण्यासाठीं म्हणून निघालों. पण, तसें घडून येण्यापूर्वीच आजचा दिवस ख्रिस्तु नोस्सु सिंजोर देवाच्या मृत दिवसाच्या पुण्यस्मरणार्थ मीं घालवावा असें ठरवून शंखवाळ गावांत गेलों. तेथें स्थानिक लोक दोन हात करण्यास सिद्ध होऊन आलेल्यांचा मीं पराभव केला आणि मीं माझें आयुष्य ईश सेवेस खर्च करण्याची माझी इच्छा सफल करून घेतली. माझ्या सहाय्यासाठीं बरोबर नेलेल्या लोकांच्या प्रतिकार शक्तीचा अंदाज प्रतिस्पर्धी-यांनीं घेतला आणि त्यांनीं मोठा हाहाःकार माजविला. पण, मीं शंखवाळ येथें असलेल्या पहिल्या देवालयाच्या शंखवाळ सीमेवरच्या आणि घाडो दैवताच्या, तसेंच परममेद, नारायण, भगवती, ईश्वर, अजोशिणी, क्रास्तासिमाई या दैवतांच्या देवालयांच्या इमारतींस आगी लावून भस्म करून अशा प्रकारें टाकल्या कीं, त्यामुळें व्हॉइसराय फार संतोषी आणि पूर्ण समाधानी पावतीलच. पण, शिवाय, आसपासच्या चर्चकडे वांकड्या नजरेनें पाहाण्याचें धाडस करणें कोणासच शक्य होऊं नये.

शंखवाळचें सर्वांत मोठें देवालय ज्याला सांतेरीचें देवालय म्हणतात, त्या देवालयाच्या इमारतीचें लांकूड फार चांगलें आहे आणि तें समुद्रानजिकच आहे. व्हॉइसरायनीं तें मोठ्या नशिबवान सां लौरेसला देतां येईल. ( सां लौरेंस म्हणजे शंखवाळच्या पैलतीरावर आगशी गावांत उभारलेलें चर्च)

ही सर्व महत्त्वाची नवीन बातमी कॉलेजच्या पाद्री लोकांस कळवावी आणि सांगावें कीं, या आसपासच्या परिसरांतील तीन चतुर्थांश देवालयांचा फडशा उडवून, त्यांच्या इमारतीमोडून त्यांचें अक्षरशः पीठ करण्यांत यश मिळवून आपण चांगली ईशसेवा केल्याचें सांगावें. ता. १७ मार्च १५६७.—"

वरील भाषांतर तात्पर्यार्थ असून त्याचा मूळ मजकूर तत्कालीन पोर्तुगीज भाषेंत आहे. आणि तो मूळ पोर्तुगीज भाषेंतील ज्यांस पहावयाचा असेल, त्या जिज्ञासू वाचकांनीं "दोकुमेंता इंदिका" खंड ७वा (इ. स. १५६६-१५९९) पृष्टें ३९२-३९३ नंबर ९० फ्रै. गोमिस व्हाज, एस्. आय. पी. (लेवोनि येंरिकिस, एस्. आय.) यत् सोसियेइस लु निये), गोवा, १२ डिसेंबर १५६७ ग्रंथ पाहून खात्री करून घ्यावी.

ही सर्व माहिती मुद्दाम येथें प्रयत्नपूर्वक देण्याचें कारण असें कीं, श्रीलक्ष्मीनृसिंह दैवत, जें प्राचीन कालीं शंखवाळ गावांत होतें, तें तेथून बाटाबाटीच्या भयानें स्थलांतर करून फोंडा तालुक्यांत आणल्यानंतर त्याच कालीं म्हणजे इ. स. १५६० सालानंतर शंखवाळ गावांत मूळ दैवताची जी देवालयाची इमारत होती, तसेंच इतर दैवतांच्या देवालय इमारती ज्या सर्व उभ्या होत्या, त्या सर्व इमारती ता. १७ मार्च १५६७ रोजीं जाळून, मोडून विध्वंस केला आहे, याचा पुरावा वरील माहितींत मिळतो. जेझुइट पंथाचे लोक बाटाबाटी करणारे पाद्री, हिंदूधर्मियांनीं आप-आपलीं दैवतें जरी दुसऱ्या राज्यांत हलविलीं, म्हणून त्या पाद्रींच्या तावडींत सांपडलीं नाहींत, तरी त्या पाद्रींचा त्वेश आणि राग यामुळें मागें राहिलेल्या देवालयांच्या दैवतांशिवाय इमारती, ते जाळून मोडून टाकीत. कारण, परत त्या इमारतींत कधीं काळीं हिंदु दैवतें पुन्हा स्थापूं नयेत म्हणून. व त्यासाठीं, त्या कालीं, मुद्दाम कायदाही सरकारनें जारी केला होता कीं, एकदां मोडून टाकलेली देवालयें पुन्हां बांधू नयेत आणि नवीन देवालयें बांधण्यास पूर्ण बंदी घातली.

## शंखावली (सांकवाळ) गावांत श्रीलक्ष्मीनृसिंह देवस्थान उत्पत्ती संबंधीं दंतकथा.

शंखावली गावांत श्रीलक्ष्मीनृसिंह देवस्थानाच्या उत्पत्ती संबंधांत थोडीशी दंतकथारूप माहिती प्राचीन कालापासून उपलब्ध आहे. ती किती विश्वसनीय आहे हें आजच्या कालांत निश्चितपणें ठरवितां येणें अशक्य असलें, तरी तिचा उल्लेख करणें प्रशस्त वाटतें. कारण, एकेकाळीं ज्यांस दंतकथा अशा नांवानें संबोधित, त्याच दंतकथा कालांतरानें इतिहास होऊं शकतात असा नामांकित इतिहास तज्ञांचा अनुभव आहे.

सासष्टी प्रांतांत, शंखावली (सांकवाळ) म्हणून जो गांव आहे, तेथें हें देवस्थान प्राचीन कालीं उदयास आलें. पण, हें श्रीलक्ष्मीनृसिंह देवस्थान तेथें उदयास येण्यापूर्वी श्रीविजयादुर्गा आणि श्रीसांतेरी म्हणजे आजची श्रीशांतादुर्गा, हीं दोन देवस्थानें त्या गावांत होतीं आणि त्याच बरोबर आणखीही दैवतें आणि त्यांचीं देवालयें तेथें होतींच याची खात्री आहे. याचा पुरावा पोर्तुगीजांनीं जी सासष्टींतील अनेक गावांतील देवालयांच्या इमारती (त्यांतील दैवतें स्थलांतर केल्यामुळें देवांशिवाय राहिल्या होत्या) मोडून टाकलेल्यांची यादी सरकारी ऐतिहासिक दप्तरखान्यांतील वह्या, हस्तलिखितें, कागदपत्र वगैरेवरुन उपलब्ध आहे, त्या यादीवरून शंखावली गावांत कोणकोणतीं दैवतें आणि देवालयें होतीं, हें समजून येतें. त्या दैवतांमध्यें 'नरसु' या नांवाचें एक दैवत होतें,तें श्रीलक्ष्मीनृसिंह देवासंबंधीं असावें कीं काय हें नक्की खात्रीपूर्वक जरी सांगतां येत नाहीं, तरी पण 'नरसु' आणि 'नृसिंह' या दोन नांवांत साम्य दिसतें म्हणून उल्लेखित दंतकथा जरी नृसिंह देवस्थान उत्पत्तीबद्दल आहे, तरी त्यांतील माहिती उपयुक्त आहे यांत संशय नाहीं. शंखवाळ गावांत प्राचीन कालीं म्हणजे स्थलांतरपूर्व कालीं, जीं दैवतें आणि त्यांचीं देवालयें होतीं तीं अशीं :- सांतेरी, ईश्वर, गांवपुरुस, श्वारोजिसीणी, नारायण, भगवती, अजोशिणी (विजयदुर्गा?) नरसू, परममेद.

वर उल्लेखित सर्व दैवतांचे उपासक सात गोत्रांचे ब्राम्हण होते. कांही कालानंतर कोणी एक 'नायक' उपनांवाचा सारस्वत ब्राम्हण कर्नाटक प्रांतांतून आपल्या आराध्य श्रीनृसिंह शालिग्रामाचें दैवत बरोबर घेऊन या शंखावली गावांत येऊन पोंचला. तो कर्मनिष्ठ ब्राम्हण पुर्वोक्त देवालयाच्या आवारांत असलेल्या एका प्रशस्त तलावावर आपलें देवतार्चन करीत मोठ्या आनंदानें त्याच गांवीं राहिला होता. गावांतील लोकांची त्याच्या विषयीं पूज्यबुद्धी वाढत चालली व त्यालाही हें रम्य स्थल पसंत पडून कांहीं काल तो तेथें वास्तव्य करून राहिला. शंखावली गावांतील लोकांची शेजारच्या कुशस्थली उर्फ कुठ्ठाळ गांवकरी लोकांशीं स्पर्धा चालली होती. उभय ग्रामस्थ मंडळींत गावांच्या सीमा निर्णयाविषयीं बराच काल पावेतों वांधा चालला होता. कुठ्ठाळकर गांवकरी त्या कालीं हे जरा जोमदार आणि संघशक्तीनें मातब्बर, यामुळें शंखावलीकरांच्या सीमेंतील बराच भाग शक्तीच्या जोरावर आपल्या गावांत सामील करून घेऊन त्याचा उपभोग बळजबरीने घेत होते. पुन्हा पुन्हा सीमा निर्णयाचा हा तंटा उपस्थित होत असे. व शिरजोरपणें कुठ्ठाळकर आपली ग्रामसीमा पुढेंपुढें ढकलीत जात असत. शंखावलीकर टेकीस आले होते. एकदां या सीमेचा कायमचा निर्णय होऊन आपसांतील तंट्याचें हें बीज कायमचें नाहींसें व्हावें असें त्यांस वाटे. पण, कुठ्ठाळकरांशीं त्यांचा उपाय चालेना.

गावांत अलिकडेच येऊन राहिलेल्या ह्या त्रयस्थ ब्राम्हणाविषयीं उभय ग्रामस्थांची आदरबुद्धी होती. एक वेळ हा सीमावाद जास्त निकरावर आल्यावेळीं शंखावलीकरांनीं सदर ब्राम्हणास ह्या प्रकाराच्या त्रयस्थ बुद्धीनें आपण निकाल करून घ्याल तर भारी उपकार होतील, अशी विनवणी केली. कुशस्थलीकरांना ही गोष्ट मान्य होण्यासारखी आहे तर पहा, असें त्या ब्राम्हणाचें म्हणणें पडलें. तदनुसार, कुशस्थलीकरांचा विचार घेऊन उभयपक्षीं मंडळीनें सदर त्रयस्थ ब्राम्हण जो सीमेविषयीं आमचे दाखले वगैरे पाहून निर्णय करील तो मान्य करावा असें ठरविले. ह्या ब्राम्हणानें उभयपक्षीयांस समक्ष आणून आपण जो निर्णय करूं, तो तुम्हांस मान्य आहे काय? असा प्रश्न केला. ब्राम्हणाच्या देवनिष्ठतेवर, व सच्छिलतेवर विश्वासून उभय पक्ष त्यावर निष्ठा ठेवून ब्राम्हणानें "मीं परकी मनुष्य तुमचे दाखले व इतर कागदपत्र किंवा भोगवटा हा मला कसा कळेल? तेव्हां मीं निर्णयाची अशी योजना केली आहे कीं, ह्या माझ्या झारींत पाणी भरून तिची धार ह्या स्थलापासून लावीत जाईन. ती जेथें संपेल तेथें गांवची सीमा पुरी झाली असें समजावें. असें केल्यास तें तुम्हांस मान्य आहे काय? असा प्रश्न केला. कुडथालीकरांस तें म्हणणें मान्य झालें. झारींतील पाण्याची धार कितीशी लांब जाईल, असें त्यांस वाटलें, व ते ह्या गोष्टीस मान्य झाले. शंखावलीकरांनींही त्या गोष्टीस होकार दिला. ब्राम्हणानें आपल्या झारींतील पाणी अभिमंत्रीत करून त्याची धार सुरू केली व ती कुशस्थलीचा बराचसा भाग शंखावलींत समाविष्ट होईपर्यंत संपेनाशी झाली.

देवापुढें उभयपक्षीयांनीं आणाभाका केल्या असल्यामुळें ह्या रीतीनें केलेला निर्णय निमूटपणें मान्यकरणें कुशस्थलीयांस भाग पडलें. पण, ब्राम्हणानें पक्षपात बुद्धीनें निवाडा केला ही अढी कुड्डाळीकरांच्या मनांतून गेली नाहीं. ते ह्या ब्राम्हणाविषयीं पुढें द्वेष बाळगून होते. कोणे एके दिवशीं संधी साधून तो ब्राम्हण निजला असतां, त्याचें देवदेवतार्चन गुपचूप तलावांत फेंकून त्यांनीं, आपला सूड उगविण्याचा मतलब सिद्धीस नेला. आपल्या नृसिंह शालिग्रामाची पूजा केल्यावांचून अन्न घ्यावयाचें नाहीं, असा त्या ब्राम्हणाचा नित्य नियम होता. अर्थात् तो शालिग्राम नाहिंसा झाला तेव्हां, त्या निग्रही ब्राम्हणानें अन्न वर्ज्य करून खडतर उपोषण केलें. दोन दिवस या प्रमाणें गेल्यावर तिसऱ्या दिवशीं त्या ब्राम्हणास स्वप्नांत देवानें सांगितलें कीं, समोरच्या तलावांत बुडी देऊन जें तुझ्या हातास लागेल तोच मीं आहें असे समजून त्याची पूजा कर व अन्न सेवन कर. या दृष्टांतानें ब्राम्हणाची व इतर लोकांचीही, देव्हारा तलावांत फेंकून दिला असला पाहिजे, अशी समजूत होऊन चुकली. ब्राम्हणानें तलावांत बुडी दिल्यावर त्यास हात सव्वाहात लांबीचें एक पाषाणमय लिंग हातीं लागलें. त्याची नृसिंह भावनेनें पूजा उरकून ब्राम्हण जेवला. पुढें तलावांत जास्त शोध केल्या अंतीं सर्व देवतार्चनाच्या साहित्यासुद्धां नृसिंह शालिग्रामही सांपडला. पुढें त्या ब्राम्हणानें सदर लिंगाला नरसिंहावताराच्या कल्पनेला जुळेल असें "स्तंभ" हें नांव कल्पून त्यावरच आपल्या नृसिंह दैवताची स्थापना करून त्यासह पूजा अर्चा चालविली. शंखावलींतील उभय देवस्थानांच्या आराधकांनीं नंतर त्याब्राम्हणाचीही उपास्य देवता स्वतंत्र देवालयांत स्थापना करून त्या ब्राम्हणास आपल्यांत पुरें मिळवून घेतलें म्हणजे आपल्या उभय देवस्थानांतही त्याला अधिकार (वांगड) देऊन कृतज्ञता व्यक्त केली. ह्या ब्राम्हणाचें 'कौत्स' गोत्र व त्याचे शंख, पिंगल व कुत्स हे प्रवर होत. तोच पुढें शंखावलीकर उपनावानें प्रसिद्धीस आला.

या दंतकथेवरून श्रीनृसिंह देवस्थान शंखावलींत नंतर अस्तित्वांत आलें व तेथील देवस्थानांचा अधिकार ह्या 'नायक' उपनांवाच्या घराण्यास मागाहून मिळाला असा इत्यर्थ निघतो. व त्याचें प्रत्यंतर त्या पुरुषाच्या गोत्रजांस श्रीनृसिंह देवस्थानांत कोणतेंही देवकृत केल्यावर गोठण येथील श्रीशांतादुर्गेस व केरी येथील श्रीविजयादुर्गेसही अभिषेक वगैरे देवकृत्य करावें लागतें, यावरून मिळतें. वैष्णवमतानुसार मूळच्या शिवलिंगास 'स्तंभ' संज्ञा मिळून तें श्रीनृसिंहस्थान बनलें, हाही तात्पयार्थ निघतो.

"श्रीसाधन नृसिंह" म्हणून जें परिवार देवतांतील एक दैवत आहे, तें दैवत या मूळ संस्थापकाची "पुरुषाची" मागाहून त्या कुळांतील वंशजानीं स्थापन केलेली प्रतिमा आहे असें दिसतें.

## प्राचीन शंखावली नगरी
## आणि
## धार्मिक माहात्म्य.

श्रीलक्ष्मीनृसिंह देवस्थान इसवी सनाच्या सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत सासष्टी तालुक्याच्या शंखावली गावांत मोठ्या वैभवांत वसत होतें. आजच्या कालांत या गांवास शंखवाळ या नांवानें ओळखत असले, तरी अतिप्राचीन कालांत शंखावली नगरी या नांवानें ओळखत असत. या अतिप्राचीन कालांत या शंखावली नगरीचें महात्म्य देवधर्माच्या बाबतींत काय होतें, हें जाणून घेण्याची उत्सुकता जिज्ञासू वाचकांस असणें स्वाभाविक आहे हें जाणून त्यासंबंधीं संशोधनपूर्वक शोधाशोध करतां जी माहिती उपलब्ध होऊं शकली, तीच जिज्ञासू वाचकांसमोर ठेवण्याचा प्रयत्न केलेला आहे.

भारतीय पुराणांच्या समृद्ध परंपरांत स्कन्दपुराणांतर्गत सह्याद्रि खंडाचें स्थान फार वरचें आहे. प्राचीनतेच्या दृष्टीनें त्याची तुलना काशी, कांची, अवन्तिकेच्या तोलाची व मोलाची आहे. उत्तरेस भडोचपासून दक्षिणेस केरळमधील मोठ्या भागाचा समावेश असलेल्या सह्याद्रिच्या ह्या परिसरांत वास करणाऱ्या प्राचीन जाती जमाती, त्यांचे आचार विचार व चालीरिती, त्यांचीं तीर्थक्षेत्रें व देवस्थानें इत्यादींचे विस्तारपूर्वक उल्लेख, व त्याच बरोबर या निसर्गरम्य प्रदेशाचें सौंदर्यात्मक वर्णन, या साऱ्यामुळें या ग्रंथाला सांस्कृतिक, वाङ्मयीन तसेंच, इतिहास संशोधकाच्या दृष्टीनें वेगळें व आगळें असें सर्वांगीण महत्त्व आहे. अशा या महत्त्वपूर्ण ग्रंथांत, शंखावली महात्म्यम्, शंखासुर वध, शंखावल्याख्यान कथनम्, कालान्तक वधः विजयामाहात्म्यम् असे अध्याय मूळ संस्कृत भाषेंत आहेत. त्यांतील उल्लेखित पहिल्या फक्तच तीन अध्यायांतील अत्यावश्यक भागाचें मराठी भाषेंत रूपांतर खालीं दिलेलें आहे.

## शंखावली नगरीचें माहात्म्य.

गोमंतकाच्या दक्षिणभागीं समुद्राजवळ शंखावली नांवाची एक शोभायमान व पवित्र नगरी आहे. स्वर्गालाही तुच्छ करणाऱ्या धनसंपन्न नगरींत श्रेष्ठ द्विज रहात असत. ते कधीं व्यग्रचित्त नव्हते. तेथें चार वर्णांचे आणि चार

आश्रमांचे लोक रहात असत. ती नगरी आंबाडा, निंब व नारळीच्या वृक्षांनीं सुंदर दिसत होती. कल्पवृक्षाचे पल्लव, बकुल, पांगारा आणि कस्तुरमोगरा हे वृक्ष तिला वारा घालीत होते. समुद्रही आपल्या गंगामिश्रित तरंगानी तिला वारा घालीत होता व तो वारा तेथील उद्यानांतून सतत वाहात होता. तेथील अरण्यांत कुश, काश, नीप, निचुळ, खैर आणि पळस हे वृक्ष शोभत होते. तेथील वेदपारंगत ब्राम्हणांनीं मंत्र, औषधी, तप व योग यांच्या सामर्थ्यानें मृत्युलाहि जिंकलें होतें. तेथील श्रेष्ठ पतिव्रता स्त्रिया अधर्मरूप पाण्यावरील सेतू व जगत्कारण होत्या. जणुं दक्षकन्याप्रमाणें असलेल्या त्या स्त्रिया गृहस्थधर्मांत तत्पर असून त्यांच्याजवळ कुबेरापेक्षांही अधिक संपत्ती होती. त्या त्या विभागाची सत्ता असलेले व अमृतधवल असे तेथील चुनेगच्ची वाडे जणूं चंद्राला हंसत होते. ती नगरी इषुपात नामक रामक्षेत्राचा एक अलंकार होता. व अधर्मी मर्त्यांना शिक्षा करणारे चित्रगुप्ताचें मंदीर होतें. येथें रोज समुद्रांतून शंखांची एक आवली म्हणजे पंक्ती किंवा रांग येत असे म्हणून तिला शंखावली हें नांव पडलें होतें. हें एक मोठें मुक्तीक्षेत्र आहे. ज्या प्रख्यात मुक्तीपुरी आहेत, त्यांहून ही कमी प्रतीची नाहीं. कारण, या नगरींत कमलनयन सनातन भगवान् श्रीविष्णु भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीं स्वतः येऊन राहिले आहेत. ज्यांच्या दर्शनानें प्राणी, संसार बंधनांतून मुक्त होतो, तो मुक्तिदाता श्रीमहाविष्णु येथें आहे. ज्यांनीं कालसदृश अतिमत्सरी दैत्यराजाचा वध केला, ते मृडनिपती, उग्रकामना पूर्ण करणारे श्रीशंकर येथेंच वास करतात. त्याची केवळ कथा ऐकल्यानें पुरुष देवलोकीं येतो. देव, असुरेंद्र, मानव, योगी द्वेष्टे आणि तपस्वी या सर्वांना जो निर्विकल्प फल देतो, तो श्रीभवानीपति सिद्धेश्वर श्रीशंकर येथेंच असतो. इच्छित परिपूर्ण करणारा विभुतशंकर, अर्धांगी भवानीसह येथेंच असतो येथें श्रेष्ठमुनींचे अनेक आश्रम असून त्यांच्या केवळ दर्शनानें पापनाश होत असे. येथेंच विष्णुक्रांतादि वनस्पतीमुळें सुंदर दिसणारे बदर्याश्रम व पैंग्य ॠषीचा आश्रम होता. यांत मोठा धर्मात्मा व सुव्रत असा एक सिद्ध पुरुष एकाग्र मनानें श्रीशंकराची आराधना करीत होता. तो भाग्यशाली श्रेष्ठ सिद्ध एका बोरीच्या झाडाखालीं तप करीत बसला असतांना, एक दिवस एक राक्षसी आली. ती राक्षसी पूर्वजन्मीं सुमुखी नांवाची ब्राम्हण कन्या होती. पण, ती पतिद्वेष्टी नेहमीं जारकर्मांत गर्क असे. ती व्यभिचारिणी नेहमीं ब्राम्हणनिंदा करीत असे. या सर्व कर्मांचा परिणाम म्हणून ती राक्षसी झाली होती. तेथेंही सर्व स्त्रियांना भीतिप्रद बनली होती. एकदां ती वाघ बनून स्त्रियांना घाबरवूं लागली. तेव्हां तिचें तें भयंकर रूप पाहून स्त्रियांनीं आक्रोश केला. त्यांचा तो आवाज ऐकून सिद्ध पुरुषाला फार दुःख झालें. तो विश्वेशाला शरण गेला व म्हणाला, हे विश्वेशा, रक्षण कर, रक्षण कर. मीं भयानें व्याकुळ झालों आहें. माझें रक्षण कर. हें त्याचें करुण वचन ऐकून दीनवत्सल शूलपाणि पिनाकधारी भगवान् श्रीशंकर तेथें प्रकट झाले. व त्याच्या केवळ हुंकारानें ती द्विजकन्या जमिनीवर पडली. सिद्ध पुरुषानें आराधना केल्यामुळें त्या ईश्वराचें सिद्धेश हें नांव जगांत प्रसिद्ध झालें. त्या सिद्धेशाला बदरीवन निवास आवडला. सिद्धेशाच्या चरणकमलीं भक्ती जडलेल्या मानवांचा अधःपात भवसागरांत हजारों कल्पकालानींही होणार नाहीं. मुंगी, हत्ती किंवा मनुष्य असो, सर्वांचे मनोरथ या सिद्धेश लिंगाच्या दर्शनानें सफल होतात. जो मनुष्य हा संपूर्ण अध्याय पठण करील किंवा ऐकवील तो सर्वपापमुक्त होऊन श्रेष्ठ गतीला जाईल.

## शंखासुर - वध.

अगस्त्य म्हणाले, हे सर्वज्ञ प्रभो भगवन्, तूं पार्वती हृदयं कमलाचा चंद्र आहेस. हे ब्रम्हन्, हें आख्यान ऐकूनही माझी तृप्ती झाली नाहीं. आपण पूर्वीं सांगितलें होतें कीं, कमलनयन श्रीविष्णूनें शंख नांवाच्या नगरींत राहाणाऱ्या शंखासुराला ठार मारलें. अद्वितीय पराक्रमी विष्णूचा शंखासुराशीं युद्ध केल्याचा आद्यंत इतिहास आपण मला सांगा. शंखासुराचें आगमन व मृडानीची कथा हें सर्व विस्तारपूर्वक सांगा. कारण आपण सर्वज्ञ आहांत. याप्रमाणें अगस्त्याचा तो मोठा प्रश्न ऐकल्यावर षडानन श्रीलक्ष्मीपतीच्या चरणकमलांचें ध्यान करून कुंभोद्भवाला म्हणाला, हे मुनिवर्या, लक्ष्मी ज्याच्या चरण कमलांचें अर्चन करते, त्या श्रीविष्णूचें चरित्र मीं तुला सांगतों, ऐक. पूर्वीं एकदां दैत्यांनीं या धरणीला फारच पीडा दिली म्हणून दैत्यभारानें आक्रांत झालेली पृथ्वी ब्रम्हदेवाला शरण गेली. गोरूप करून तिनें आपलें सर्व दुःख त्याला निवेदन केलें. तें ऐकून लोकेश ब्रम्हदेव व श्रीशंकर पृथ्वीसह क्षीरसागराच्या तीरावर गेले. त्यांच्या बरोबर वन्हि, इंद्र, यम, निऋति, वरुण, वायु, ईश इत्यादि सर्व चांगले लोकपालहि होते. तेथें शेषशायी लक्ष्मीपतीला पाहून त्यांनीं चारही वेदांच्या सारभूत स्तवनांनीं त्याची स्तुती केली. रजोमूर्ति व शुद्ध ज्ञानरूप श्रीकेशवानें ती स्तुती ऐकली व ब्रम्हा, इंद्र, त्र्यंबक त्रभूति सर्व देवांकडे पाहून श्रीविष्णूनें केवळ आपल्या शद्बानींच त्यांच्या दुःखाचा नाश केला.

भगवान् श्रीविष्णू म्हणाले, देव हो, तुमचें ऱ्हद्गत मला समजलें. ही पृथ्वी दैत्यभारानें व्याकुळ झाली आहे. ज्या कार्यासाठीं तुम्हीं आलांत, तें कार्य मीं करतों. यदुवंशीय आनक दुंदुभीच्या घरीं जन्म घेऊन मीं ह्या शेषाच्या द्वारें तुमचें तें शल्य उपटून काढतों. मीं पृथ्वीचा उद्धार करणार व पुष्कळ दैत्यनाश करून पृथ्वीचा तापही नष्ट करणार. यासाठीं आपणही पृथ्वीवर चला. देवस्त्रियासुद्धां माझ्या इष्टसिद्धिसाठीं जन्म घेणार आहेत. याप्रमाणें देवांना सांगून श्रीहरि तेथेच अंतर्धान पावले. सर्व देवहि आपापल्या स्थानीं निघून गेले. पुष्कळ कालानंतर भोजराजा बंदिवासांत असतां प्रतापी श्रीविष्णूनें वसुदेव देवकीच्या ठिकाणीं जन्म घेतला. कश्यप व अदिति यांनीं पूर्वजन्मी श्रीविष्णूची आराधना केली होती. त्या तपाचें फळ म्हणून श्रीविष्णूनें यादव कुळांत जन्म घेतला. तो वसुदेवसुत श्रीकृष्ण या नांवानें प्रसिद्ध झाला. शेष हा बलदेव झाला. त्यालाच संकर्षण म्हणतात. सर्व बलवान देव यदुवंशांत जन्मले. सर्व देवांगनांनीं राजकन्यारूपानें जन्म घेतला. श्रीकृष्णानें नरकासुराला ठार मारून त्या सर्व राजकन्यांना आपल्या मंदिरांत नेलें. कांहीं देवांगनांनीं भगवंताच्या प्रेमासाठीं गोपगृहीं जन्म घेतला. अत्यंत अल्पमति देवाना मात्र हा बेत बिलकुल समजला नाहीं. नंतर भगवान् श्रीविष्णूनें श्रीकृष्ण शरीर धारण करून भूभार कमी करण्यासाठीं पूतना, अरिष्ट, कंस, इत्यादि बलवान् शत्रूंना ठार केलें. चांदण्या रात्रीं महासत्व श्रीकृष्णानें व्रजस्त्रियांसह रासक्रीडा केली. हें सर्व श्रीकृष्णचरित्र तूं ऐकलेंच असशील. तथापि, शंखासुराचा प्रसंग म्हणून मीं तें पुनः सांगितलें आहे. अत्यंत बुद्धिवान् गोपरेषधारी श्रीकृष्णानें भरसभेंत कंसवध करून आपली माता देवकी व पिता वसुदेव यांची मुक्तता केली. भोजगृहीं शृंखलाबद्ध करून ठेवलेल्या उग्रसेन इत्यादिकांना गोपभूषण श्रीकृष्णानें सोडविलें. विश्वव्यापी श्रीविष्णूनें नम्र होऊन वसुदेवाला संतुष्ट केलें व वसुदेवालाही श्रीहरि आपला सामान्य पुत्रच वाटला. त्या चक्रधारी श्रीविष्णूनें उग्रसेनाला राज्य दिलें. सर्व देवश्रेष्ठांना पृथ्वीवर आणलें व पृथ्वीवर राज्य केलें. त्याला आपला सामान्य पुत्र समजून वसुदेवानें त्या उभयतांचे उपनयनादि मंगल संस्कार केले.

उभय पुत्रांचा गायत्री व्रताचा शुभसंस्कार झाल्यावर ते दोघेही सांदीपनी गुरूच्या घरीं गेले. निग्रही व मिताहारी असे ते दोघे गुरुसेवेंत तत्पर राहून सांदीपनीला मोठें दैवत समजून त्याची पूजा करीत होते. सर्व विद्यांचे मूळ प्रवर्तक असे ते ज्ञानी देवश्रेष्ठ चौदा विद्यांमध्यें पारंगत झाले. त्या महामति कुमारांनीं सांदीपनी गुरूची आनंदीत मनानें गुरुदक्षिणेसाठीं प्रार्थना केली. त्या ब्राम्हण गुरुनें त्यांचें तें अद्भूत तेज पाहून म्हटलें, देवोत्तमांनो, चौदा विद्यांचें शुल्क धा. बाळांनो, तुम्हीं माझा मृतपुत्र मला द्यावा, हीच मीं तुमच्याकडे याचना करतों. हें ऐकून भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, गुरुजी तुम्हीं हें काय बोलतां? तुमचा मुलगा कसा होता व त्याला मृत्यु कसा आला, तें मला सांगा - लगेच सांदीपनी गुरुजी व गुरुपत्नी यांच्या डोळयांत अश्रु आले. ते त्याला म्हणाले,: कृष्णा मीं तुला सर्व वृत्तांत सांगतो ऐक.

एकदां सूर्यग्रहण होतें. सर्व भारतीय प्रजा प्रभास तीर्थावर जमल्या होत्या. दुर्दैवी मीं सुद्धां पत्नी व मुलांना बरोबर घेऊन तेथें गेलों. तेथें जमलेला तो जनसमुद्र पाहून मला धन्यता वाटली. समुद्रांत कांहीं लोक बुड्या मारीत होते, कांहीं पोहत होते व कांहीं होडींत बसून मौज करीत होते. त्यामध्यें माझा सुलक्षणी मुलगा स्नान करण्यास गेला. पण, तो पुनः दिसलाच नाहीं. मीं दुःख सागरांत बुडून गेलों व गळयांत शिळा बांधून पुत्रामागून मरण्यास सिद्ध झालों. पण, लोकांनीं माझ्या गळयांतील तो दगड सोडवून मला त्या कर्मापासून परावृत्त केलें. अच्युता, तेव्हांपासून मीं स्वतःस पापी समजतों. हे जगत्पते, तुझ्या दर्शनानें मीं कृतार्थ झालों. कारण, यमाच्या घरीं गेलेला पुत्र परत देण्यास तूं समर्थ आहेस.

स्कंद म्हणाले : त्याचें तें भाषण ऐकून कृष्णानें द्विजोत्तमाचें सान्त्वन केलें, आणि रथयुक्त व सशस्त्र दारुकाचें स्मरण केलें. स्मरण करतांच एका क्षणांत, दैत्यांना भयावह अशीं शस्त्रें घेऊन दारुक उपस्थित झाला. नंतर कृष्ण ज्येष्ठ बंधूसह रथांत बसून जेथें सांदीपनी पुत्र पुर्वीं मेला होता, त्या प्रभास तीर्थावर गेला.

### शंखावलीची कथा.

स्कन्द म्हणालेः श्रीकृष्ण आल्याचें ऐकून समुद्रानें त्याच्याशीं भाषण केलें. तेव्हां सुरेश्वर श्रीकृष्णानें समुद्रास गुरुपुत्र आपल्या स्वाधीन करण्याबद्दल बजाविलें. अप्रमेय श्रीकृष्णाचें तें वचन ऐकून सागर म्हणाला, माझ्या पाण्यांत पंचजन्य नांवाचा दैत्य आहे. तो वरचेवर माझ्या पृष्ठभागावर मोठ्या लाटा आणून मला पीडा देत असतो. त्याच रागीट प्राण्यानें तुझा गुरुपुत्र नेला आहे. त्या महाबलिष्ठ युद्धखोराला ठार मार. तें ऐकून श्रीहरीनें पाण्यांत प्रवेश केला. तेथें त्या अमोघ विक्रमी श्रीकृष्णाला शक्तिशाली पांचजन्य दिसला. तो असुर आपल्या असंख्य बांधवांसह श्रीकृष्णाबरोबर युद्ध करूं लागला. अद्भूत रूप

घेऊन तो भगवंताच्या छातीवर आपल्याच वंशाचे शंख फेकूं लागला. अतिपराक्रमी भगवान् मधुसूदनालासुद्धां जोरानें आदळणाऱ्या त्या शंखांचा वेग सहन झाला नाहीं. याप्रमाणें पाण्यांत त्यांचें भयंकर यद्ध जुंपलें. श्रीकृष्णानें शेवटीं पांचजन्याला आपल्या सुंदर नखांनीं फाडलें. त्याच्या उदरांत त्याला गुरुपुत्र दिसला नाहीं; पण त्याचे अवयव व हाताचे तळवे दिसले. नंतर श्रीकृष्ण हातांत शंख घेऊन सर्व असुरांना धमकी देत पाण्याबाहेर ज्या भूतलावर आला तेंच रामक्षेत्र होय, व तेंच गोमन्ताचल नांवाचें रमणीय शिखर सह्याद्रिचें होय. पवित्र इषुपात क्षेत्र, बदरिकाश्रम येथें असून श्रीकृष्ण बाहेर येतांच, त्याच्या मागून पांचजन्य वंशांतील महाशंखही क्रमानें यदुपतीबरोबर लढण्यासाठीं आले. श्रीभगवान् म्हणाले, माझें प्रेमाचें मुक्तिदायक वचन ऐका. मीं रणांत ठार मारलेला पांचजन्य, त्याच्या हातांत असलेले अवयव ज्यांचे असतील त्यांच्या वंशाचाही मीं उद्धार केला आहे. आपल्या कर्मानुसार यमलोकीं यातना अनुभवीत असलेल्या गुरुपुत्रालाही कांहीं कालानंतर मागून घेतलें आहे. शंख हो, जे कोणी आजपासून येथें येऊन प्राणत्याग करतील, ते सर्व माझ्या सन्निध येतील. तेव्हांपासून ते शंख त्रिभुवनांत पूज्य झाले. याप्रमाणें जगत्पतीनें त्या शंखांना वर दिला. श्रीकृष्णही तेथेंच अंशभूत राहिला. तेव्हापासून तें पवित्र क्षेत्र जगप्रसिद्ध झालें. अधापही शंख आपला देह टाकून भगवंताच्या रमणीय वैकुंठपदीं जातात. तेव्हांपासून शंखावली नांवाची रमणीय नगरी श्रीविष्णूच्या चरणजलाच्या स्पर्शानें अतिपावन झाली. जेथें महिषासुराच्या वंशांतील लोकासुरानें डुकराचें रूप घेऊन लोकांना त्रास दिला, त्या शंखक्षेत्रांत शंखाला गिरिजेनें ठार मारल्यावर तो दैत्यही विष्णुस्वरूप बनला. म्हणून त्याच्याच नांवानें शंखलोक हें क्षेत्र अत्यंत कल्याणकारक व मुक्तिदायक झालें. श्रीनाल अशी श्रींची एक संज्ञा असून त्यांचें तें मोठें स्थान आहे. कारण, तेथें वैकुंठदर्शनासाठीं श्रीकामरूपानें रहाते. तेव्हांपासून कमळासारखें श्रीनालक्षेत्र हें श्रीलक्ष्मीचें व श्रीनारायणाचें उत्तम संकेतगृह झालें आहे. तें पवित्र क्षेत्र मनुष्यांना दुर्मिळ असें आहे. श्रीरमण हरीची जे पूजा करतात, ते पापी लोक सुद्धां कोट्यवधी जन्मांतील पापांतून मुक्त होतात

## स्थलांतर पूर्वकालीन देवस्थानच्या मालकी हक्काच्या जमिनींची माहिती

प्राचीन कालीं सासष्टी तालुक्याच्या सांखवाळ गावांत हें देवस्थान असताना त्या देवस्थानच्या मालकी हक्काच्या जमिनी किती, कोणत्या, कशा तऱ्हेच्या होत्या, त्यांत शेती, बागायती, कुळागरें असावींत काय, आणि असल्यास त्यांबद्दल कांही माहिती मिळेल काय याबद्दल संशोधनात्मक प्रयत्न करून त्या ग्रामसंस्थेचें जुनें दप्तर, तसेंच गोवा सरकारच्या पुरातत्व खात्यांतील पोर्तुगीज कालीन इ. सनाच्या सोळाव्या शतकांतील कागद पत्रें, हस्तलिखितें बारकाईनें तपासून पहातां, त्यांत ता. ७ मार्च १५६८ रोजीं केलेला पंचनामा सरकारी जज्ञानें विधिपूर्वक केलेला मिळाला. त्या पंचनाम्यांत शंखवाळ गावांत असलेल्या सर्व देवालयांच्या जमिनींचा सविस्तरपणें आढावा घेतल्याचें स्पष्टपणें नजरेस आलें. हा पंचनामा तत्कालीन पोर्तुगीज व्हॉइसराय यांच्या हुकुमानें आणि त्यानींच नेमलेल्या आंब्रोझियु दे सौझ नांवाच्या जज्ञानें शंखवाळ गावांत येऊन तेथें त्या गांवचे तत्कालीन गांवकार, कुलकर्णी, इस्क्रीव्हांव (ग्रामसंस्थेचें लिखाण करणारे सेक्रेटरी), साक्षीदारांसह तेथील हिंदु व नवख्रिश्चन इत्यादि लोक जमवून त्या सर्वांकडून प्रत्येक धर्माच्या चालीरिती रिवाजाप्रमाणें त्या प्रत्येकाकडून आपल्यासमोर प्रमाणपूर्वक शपथ घेववून, त्या सर्वांकडून, त्या देवस्थानांच्या मालकी हक्काच्या सर्व जमिनी, तसेंच त्या देवस्थानचे सर्व सेवेकरी, गुरव, जोगी, घाडी, धुमाळी, नेरगुडी, भटजी, सुतार, लोहार, चितारी, कुंभार, धोबी, भंडारी, देवस्थानची हिलामत पताका वाहविणारे, कुळागरांत काम करणारे, दैवतांच्या उत्सव मिरवणुकींत भाग घेणारे, देवालयांच्या इमारती-घरें यांची शाकारणी शिवणावळ करणारे कुंभार, नमशी नामक जमिनींचे भोगवटदार, नृत्यांगना कलावंती या सर्वांच्या भोगवटी खालीं असलेल्या देवस्थानच्या सर्व जमिनींची पूर्ण यादी एकंदर सर्व माहितीसह सादर करण्यास त्या सर्वांस बजाविलें. शिवाय, स्पष्टपणें ताकीद दिली कीं, त्यांनीं फक्त विश्वास आणि जबाबदारीपूर्वक सर्वप्रकारें खरी तीच माहिती दिली पाहिजे. देवस्थानच्या मालकीहक्काच्या जमिनी लपवून ठेवतां कामा नये. तसेंच, द्वेषबुद्धीनें परकी इसमांच्या जमिनी, देवस्थानच्या आहेत अशी खोटी माहिती देऊं नये. जर यदाकदाचित् कोणीही खोटी माहिती दिल्याचें उघडकीस येईल, तर त्याबद्दल व्हॉइसराय यांनीं ठरवून दिल्याप्रमाणें, गुन्हेगार कडक शिक्षेस पात्र होईल व त्यास सहा वर्षें हद्दपारीची कैदेची शिक्षा होईल व त्याची इस्टेटही जप्त होईल. तसेंच, या गावाबाहेरील लोकांनीं या गांवच्या देवस्थानांस ज्या जमिनी दिल्या असतील, किंवा या गावांतील लोकांनीं किंवा देवस्थानांनीं इतर गावांतील (सासष्टी तालुक्यांतील) देवस्थानांस जर जमिनी दिल्या असतील, तर त्या सर्व

जमिनींची आपणास माहिती द्यावी, असा हुकूम त्या जज्ज साहेबांनीं दिला. आणि त्या हुकुमास पाळा देऊन त्या उपस्थितांकडून जी माहिती मिळविली त्या माहितीचा पंचनामा त्या जज्जसाहेबांनीं केला. त्या पंचनाम्यावर सर्व उपस्थित अधिकाऱ्यांच्या आणि साक्षीदारांच्या सह्या आहेत. त्या पंचनाम्याची प्रत पोर्तुगीज कालीन ऐतिहासिक सरकारी दप्तरखान्यांत आहे व ती प्राचीन पोर्तुगीज लिपींत आहे. आजच्या कालांत त्या तशा लिपीनें लिहिलेला पंचनामा त्या लिपींत निगटीत असलेल्या माहितगार किंवा सराव असलेल्या इसमांशिवाय इतरांस वाचूं येणें शक्य नाहीं हें जाणून, आणि जिज्ञासू वाचकांची उत्सुकता लक्षांत घेऊन, त्या पंचनाम्यांत काय माहिती आहे याची जास्तींत जास्त नोंद घेऊन त्याचें मराठींत रूपांतर येथें देण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यामुळें इच्छुकांस कोणत्या दैवताच्या देवालयाच्या मालकी हक्काची कोणती जमीन किंवा जमिनी, तिचें नांव कोणतें, देवालय कोणत्या जमिनीवर होतें, अशी उपयुक्त बरीच माहितीही मिळू शकेल. जमिनीच्या तत्कालीन चतुःसीमा येथें भाषांतर करून देऊन त्याचा प्रत्यक्षांत कांहींच उपयोगही नाहीं म्हणून विस्तारभयास्तव तसें करण्याचें टाळलें आहे.

हा पंचनामा "आंब्रेझियु दे सौझ" या नांवाच्या जज्जसाहेबांसमोर त्यांच्या प्रत्यक्ष उपस्थितींत झाला असून तो लिहिणाऱ्या इश्क्रीव्हांव म्हणजे लेखक किंवा सेक्रेटरी याचें नांव "पेरु कोर्नेज्यु" असें आहे. त्या पंचनाम्यांत, जी मंडळी हजर असलेल्या पैकींचीं नांवें आहेत, तीं नांवें अशीः- नुनु बाऱ्हेतु - दाजू सगुण शेणवीं - गोर्नु शेणवीं - नरसू भांडारी - नारायण नाईक - म्हाबळा शेणवीं - कृष्ण नाईक - विठ्ठल (विठू) भांडारी -विठ्ठल कामत - केतु कामत - गणू भांडारी - माकू पडियार - सांतू कामत - रामू शेणवीं - म्हाबळा माईक - हे सगळे गांवकार; पद्मा शेणवीं - गांवचा इस्क्रीव्हांव (लेखक, कुळकर्णी किंवा सेक्रेटरी) या पंचनाम्यावर ज्या सह्या आहेत त्या सह्या खालील प्रमाणें नांवाच्या आहेतः- नुन बार्रेतु - दाजू शेणवीं - गणू शेणवीं - नरसू भांडारी - नरूस नाईक - म्हाबळा शेणवीं - विठू मांडारी - कृष्ण नाईक - आल्व्हरु गोंसाल्व्हिस - पावलु दे ब्रागांस - पेरु कुलासु - जुआंव कुर्तीज्यु - बाल्ताझार दियस - (पोर्तुगीज) - जोर्ज दे मिनेझस - आंब्रोझियु दे सौझ - आणखी हिंदु असे शद्ध आहेत.

वरील नांवें, पंचनाम्यांत ज्या जुन्या पोर्तुगीज लिपींत लिहिलेलीं आढळतात तीं वाचकांच्या वाचन सोईसाठीं सद्यःकालीन उच्चारांत बसतील अशा रितीनें येथें दिलीं आहेत. उदाहरणार्थ :- सिनाय असें मूळ लिपीच्या लिखाणांत असलेलें शेणवीं असें दिलें आहे. कामोति असें जेथें आहे, तेथें कामत दिलें आहे. परियार असें जेथें आहे त्या ऐवजीं पडियार असें दिलें आहे. असें लिहिण्याचें कारण, त्या जुन्या प्राचीन कालांतील पोर्तुगीज लिपीचे उच्चार व आजच्या कालांतील त्या त्या उपनांवांचा उच्चार, यांत बराच फरक आढळतो आणि त्यामुळें आजच्या कालांतील पिढीच्या वाचकांस खऱ्या उपनांवांची ओळख चटकन् मिळावी, अडचण भासूं नये, या हेतूनेंच तीं नांवें तशा पद्धतीनें लिहिलीं आहेत. मूळ लिपी पोर्तुगीज भाषेंतील पंचनामा कसा आहे याची साद्यंत सविस्तर माहिती घेऊं इच्छिणाऱ्या अभ्यासूंनीं गोवा सरकारच्या पुरातत्व खात्यांत जाऊन तो पंचनामा पाहावा. त्या पंचनाम्यांत सांखवाळ येथील प्रत्येक दैवताच्या देवालयाच्या मालकी हक्काच्या जमिनी कोणकोणत्या होत्या, याची माहिती मिळते. ती माहिती मराठी भाषेंत रूपांतरीत करून खालीं दिली आहे.

सांखवाळ

सांतेरी, ईश्वर, गांवपुरुष, धारो आझोसिनी या देवालयांच्याः-

-जमीन, ज्यांत सांतेरी देवीचें देवालय होतें, आणि वर उल्लेखित देवालयें होतीं, आणि जी जमीन दारुका नामक गुरव याच्या भोगवट्यांत होती.

-एक कुळागर ज्याचें नांव "माडियांचें कुळागर." ज्याचे भोगवटदार म्हाळू, धाकटो, पोमगु, सांतप्पा, सिदप्पा नांवाचे गुरव होते. पोमगु हा इसम ख्रिस्ती धर्मांत गेल्या नंतर त्यास दियोगु फ्राज या नांवानें ओळखत. म्हाळू यास ख्रिश्चन झाल्यानंतर फिलीप या नावाने ओळखत.

शेत जमिनी.

-एक शेत "गुरवाचे गुरुंजीयोचारे" नामक दोन पिकांचें.

-दुसरें शेत "कुआझिनी शेतां दोन" नामक.

-आणखी शेत "आल" नामक.

नारायण, भगवती व ईश्वर या देवालयांच्याः

-एक जमीन, ज्या जमिनींत नारायण देवाचें देवालय होतें व ती जमीन बनू भट, सांतू भट हे देवालयाचे सेवेकरी यांच्या भोगवटींत होती.

-दुसरी जमीन ज्या जमिनींत भगवती आणि ईश्वराचें अशीं देवालयें होतीं, व ती जमीन बनूभट आणि सांतूभट यांच्या भोगवट्यांत होती.

-एक कुळागर "सिर्कुरियाचें" नामक ज्याचा अर्धा भाग विठू शेणवीं आणि अर्धा भाग गोविंद भांडारी व राम भांडारी भोगवटा करीत.

-एक बागायत "लिमगेयाचेयांतै" नामक जी रवळू पडियार उपभोगीत असे.

-एक कुळागर "सिरीमदालें भाट" नामक जें सिंगी शेट (सोनार) उपभोगीत असे.

-जमीन "रारो पाटो" नांवाची. जिचा अर्धा भाग आझू शेणवीं आणि अर्धा भाग उपतोपा (विठोबा?) नाईक याप्रमाणें उपभोगीत असत.

शेती:

-एक शेतजमीन "पाटो दौयेकुना सिनी" नांवाची.

-दुसरी शेतजमीन "नाकेली मोळो" नांवाची.

-एक बागायत "उमंड नमसी" नांवाची जिचा २/३ भाग पोको कुणबी आणि १/३ भाग कोलो कुणबी या प्रमाणें उपभोगीत असत.

"आझोसिनी" देवालयाच्या:

-एक जमीन, ज्या जमिनींत "आझोसिनी" चें देवालय होतें आणि ती जमीन बनू भट व सांतू भट देवालयाचे सेवेकरी उपभोगीत असत.

"नरसू" च्या देवालयाच्या:

-एक जमीन, ज्या जमिनींत नरसूचें देवालय होतें, आणि ती जमीन त्या देवालयाचे सेवेकरी विठ्ठल भट, गणेश भट, आणि धुमाळी नरसू उपभोगित असत.

-एक कुळागर "नरसासनाक" नांवाचें जें नार भांडारी आणि नरसू भांडारी हे उपभोगीत असत.

-एक बागायत "वोरापारचे भाट" जें विठ्ठल भांडारी, सांत भांडारी व गुणो भांडारी आणि नरसू भांडारी हे उपभोगीत असत.

शेत जमिनी:

-एक शेत "पार्नोलीं दोन" नांवाचें दोन पिकांचें.

- दुसरें शेत "पिंपोलिति."

-एक जमीन "वैजारिचें भाट" नांवाचें ज्या जमिनींत वैजारीचें देवालय होतें.

-एक शेत "असोल्पो" नांवाचें जें म्हाबळा भट देवालयाचा सेवेकरी उपभोगीत असे.

परममेद देवालयाच्या:

-एक कुळागर "अजितर" नांवाचें जें सांतू भट उपभोगीत असे ज्याला आज ख्रिस्तधर्मीय झाल्यानंतर पेद्रु कुलासु या नांवानें ओळखतात.

ग्रामलेखक (इस्क्रीव्हांव) यानीं सांगितलें कीं, गांवकार लोकांनीं "नाकेली" वाड्याचा "फोर" रद्द करून त्या ऐवजीं देवालयास तेल जें प्रतिवर्षीं लोहारांकडून गुरव वसूल करीत असत. (फोराची रक्कम १४ तांगां पांढरीं).

गांवकार लोकांनीं सांगितलें कीं, ते प्रतिवर्षीं अविवाहीत स्त्रियांस (भाविणीस?) देवालयांत झाडू मारून स्वच्छ करण्यासाठीं साडेतेरा तांगां पांढरीं देत असत. शिवाय, पेर्णी यांस प्रतिवर्षीं पांच देवालयांत काम करण्यासाठीं ३१ तांगां पाढरीं १ मण ८ कानाड तेल दिव्यांसाठीं, आणि दोन बरगणी ६ बाजारक्या विड्यासाठीं (विड्यांचीं पानें आणि सुपारी) देत असत.

या शिवाय, बारा झाडें पोफळीचीं प्रतिवर्षीं; त्यांतील ११ या गावांतील देवालयांसाठीं, आणि १ झाड मुरगांव येथील देवालयासाठीं, पांच दिग्यो पांच बरगणी त्या पोफळीच्या झाडासाठीं देत असत.

या शिवाय, प्रतिवर्षीं ६ बरगण्या तेल खर्चासाठीं एक कायम दिवा (नंदादीप?) एक जोगी (संन्यासी) याच्या समाधीकडे पेटविण्यासाठीं देत असत.

"आंवळी भोजन" नांवाच्या भोजन संतर्पणाच्या खर्चाकरतां प्रतिवर्षीं सात बरगणी देत असत.

वाद्यें वाजविणारे वाजंत्री, तासे, शेनई-सुर्त वाजविणारे, आणि एक भावीण या सेवेकऱ्यांस ३६ तांगां आणि दुसरी भावीण जी सांतेरीच्या देवालयांत सेवा काम करते तिला दहा तांगां पांढरीं आणि तीन बरगणी देत असत.

सांतेरीच्या देवालयांतील गुरव, आणि एक तरुण यांस पांच तांगां पांढरीं आणि तीन बरगणी प्रत्येक वर्षीं, तसेंच, वाजंत्री आणि एक भावीण, देवालयाचे सेवेकऱ्यांस, छत्तीस तांगां पांढरीं मिळून ४७ तांगां पांढरीं व एक बरगणी देत असत.

वर उल्लेखित व्यवस्थेशिवाय, ते सर्व गांवकार प्रतिवर्षीं नारायण देवाच्या "दिंडी" नांवाच्या उत्सवाच्या खर्चासाठीं म्हणजे ज्यावेळीं नारायण देव इतर देवालयांकडे भेटीसाठीं मिरवणुकीनें जात असत, त्या उत्सवाच्या खर्चासाठीं तीन तांगा पांढरीं आणि पालखी देत असत, आणि या दिंडी उत्सवांत जे देवालयापुढें गाणें (भजन?) करीत, त्यांचाही सर्व खर्च सोसीत असत.

या शिवाय, हे गांवकार प्रतिवर्षीं ज्यावेळीं भटजी उत्सव करण्याच्या कारणानें येई, त्यावेळीं त्यास ८ कुडव तांदुळ- त्यांत एक पड कमी, इतके तांदुळ, ३० नारळ, एक बरगणी, १०० विड्याचीं पानें, २५ सुपाऱ्या इतकें देण्याची जबाबदारी घेत.

एक कुळागर "जोशीची नमसी" नांवाचें ज्याचा एक

चतुर्थांश भाग राणू क्रमवंत आणि सांतू भट उपभोगीत. आणि तीन चतुर्थांश भाग राणू केणी उपभोगीत असे. आणि हे भोगवटदार त्या कुळागराबद्दल प्रतिवर्षीं गांवकरी यांस एक बरगणी आणि साडेनऊ लेयाइस इतकी रक्कम देत असत. गांवकार प्रतिवर्षीं साडेचार बरगणी देवून सूर्यचंद्रादिकांचा धार्मिक विधी करीत असत.

-एक शेत "गुआनिचें आडें" नांवाचें.

-केंकार नाईक याच्या शेत जमिनीचे ३॥ भाग. त्यांतील एक भाग नारायण देवाच्या देवालयाचा असून तें शेत फक्त वायंगण पिकावळीचेंच आहे.

-एक बागायत "बायतोंड" नांवाची- ही देवालयाची नमसी असून ती नरसू कामत आणि राम पडियार हे उपभोगीत असत. हे भोगवटदार या बागायतीचा वार्षिक फोर चार बरगिणी "आझोसिनी" देवालयास देत असत. व गांवकार एक बरगणी आणि दीड बाजारुक इतकी रक्कम प्रतिवर्षीं देत.

-एक शेतजमीन, "आरोस कारांची नमसी कुणगी" नांवाची असून त्या शेतजमिनीचे भोगवटदार प्रतिवर्षीं फोर म्हणून सहा गिंडे तेल देवालयास देतात व त्याशिवाय ग्रामसंस्थेस दोन बरगणी आणि १९॥ लेयाइस एवढी रक्कम देत असत.

-एक दुकान "जुमारीचो पसरो" नांवाचें, प्रतिवर्षीं देवालयास ९ गिंडे तेल देत आहे. या गावांत कांहीं वर्षापासून तीन दुकानें आहेत. एखादे वर्षी दोन दुकानें असतात. तीन दुकानें असोत, दोन असोत किंवा फक्त एकच दुकान असो, कोणत्याहि परिस्थितींत देवालयांस वार्षिक नऊ गिंडे तेल देत असत.

-"व्हडलें खाजन" नांवाच्या शेत जमिनीचे फौरैर म्हणजे उपभोगणारे प्रतिवर्षीं सांतेरीचें देवालय चुडतांनीं छप्पर शाकारणी स्वखर्चानें करीत असत.

-"बोरी" नांवाच्या शेतजमिनीचे भोगवटदार प्रतिवर्षीं स्वखर्चानें ग्रामपुरुष व वैजेश्वर या देवालयांची चुडतांनीं शाकारणी करीत असत.

-"व्हडले दागु" नांवाच्या शेताचे भोगवटदार प्रतिवर्षीं धाडो देवालयाचें छप्पर चुडतांनीं शाकारणी स्वखर्चानें करून शिवाय आवश्यक तेंही करीत असत.

-"सुर्पे खाजन" नांवाच्या शेताचे भोगवटदार हे प्रतिवर्षीं भगवतीचें देवालय चुडतांनीं छप्पर शाकारणी व बाकी डागडुजी स्वखर्चानें करीत असत.

-"धाकटो दागु" नांवाच्या शेताचे भोगवटदार ईश्वराचें देवालय छप्पर चुडतांनीं शाकारणी करून इतर जरूर ती सर्व डागडुजी स्वखर्चानें करीत असत.

-"व्हडली पोंडीची अर्ध" नांवाच्या शेताचे भोगवटदार नारायण देवाचें देवालय छप्पर शाकारणी चुडतांनी करून इतर डागडुजीही जरुर ती सर्व स्वखर्चानें करीत असत.

-"आसोल्प" शेताचे भोगवटदार "वैजारिस्त" देवालयाचें छप्पर शाकारणी जरुरीप्रमाणें लांकूडही वापरून चुडतांनी स्वखर्चाने करीत असत. आणि याकामीं लागणारे मजूर व इतर सर्व खर्च या शेतीचे भोगवटदारच करीत असत.

-"व्हडलें खाजन" नांवाच्या शेत जमिनींत एक तुकडा किंवा भाग "वरको" नांवाचा आहे. तो भाग या सबंध शेतीच्या भोगवटदारांनीं आपल्या देवकृत्यांच्या खर्चासाठीं सांतेरी देवालयास दिला आहे. नारळीच्या झाडांसंबंधीं लिहिलें नाहीं.

-दागु कामत याच्या कुळागरांतील एक नारळीचें झाड (माड) जोशी यास दिलें आहे. दागु नाईक याच्या कुळागरांतील नारळीचीं दोन झाडें (माड) जोशी व त्याचा बंधू मिळून दोघे इसम यांस दिले आहेत. राम प्रभू याच्या बगीच्यांतील नारळीचीं दोन झाडें (माड) जोशी यास दिलीं आहेत. माते प्रभू याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड जोशी यास दिलें आहे. अने कामत, आज ख्रिश्चन, याच्या बगिच्यांतील नारळीचें एक झाड जोशी यास दिलें आहे. वांठू शाटीं आणि मादु शाटीं यांच्या बगीच्यांतील नारळीचीं दोन झाडें जोशी यास दिलीं आहेत. देवगो नाईक याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड जोशी यास दिलें आहे. रामू कामत याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड जोशी यास दिलें आहे. म्होबळा पडियार याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड जोशी यास दिलें आहे. गोर्गुआ कामत याच्या बगीच्यांतील नारळीचीं दोन झाडें जोशी यास दिलीं आहेत. रामू कामत याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड जोशी यास दिलें आहे. अंता भांडारी याच्या बगीच्यांतील दुसरें नारळीचें झाड. गोर्ग्या कामत याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड मर्ते शेणवीं याच्या घरास फारीक करून जोशी यास दिलें आहे. कृष्ण कामत याच्या बगीच्यांतील नारळीचीं दोन झाडें पैकीं एकाची किंमत त्याच्या घरास देऊन व दुसरें झाड वेगळया बागायतींतील मिळून दोन झाडें जोशी यास दिलीं आहेत. गुआ नाईक याच्या बगीच्यांतील नारळीचीं दोन झाडें जोशी यास दिलीं आहेत. गणू भांडारी याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड जोशी यास दिलें आहे. पद्मा शेणवीं (इस्क्रीव्हांव) याच्या बगीच्यांतील दोन झाडें जोशी यास दिलीं आहेत.

रवळू शेणवीं याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड जोशी यास दिलें आहे. वना भांडारी याच्या बगीच्यांतील नारळीचें वेगळें झाड जोशी यास दिलें आहे. गोविंद प्रभू याच्या बगीच्यांतील दोन झाडें नारळीचीं, जोशी यास दिलीं आहेत. रामू नाईक वारी याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड जोशी यास दिलें आहे. अबा भांडारी याच्या बगिच्यांत नारळीचें एक झाड दिलें आहे तें दाभोळी गांवच्या सीमेजवळ. नरसू नाईक याच्या बगीच्यांतील नारळीचें एक झाड दिलें आहे. सांतप्पा याच्या बगीच्यांतील दुसरें नारळीचें झाड दिलें आहे. म्हाबळा भांडारी याच्या बगीच्यांतील नारळीचीं तीन झाडें जोशी यास दिलीं आहेत.

-मागें वर उल्लेखिलेल्या शेतजमिनीच्या भोगवटदारांनी शेती जमिनी खाऱ्या पाण्यानें भिजविल्याची माहिती दिली.

-म्हाबळा नाईक, "व्हडलें खाजन" नांवाच्या शेतजमिनीचा शेतकरी यानें आपल्या धर्मिक रीति रिवाजाप्रमाणें शपथेनें प्रमाण करून जज्ञ साहेबांस सांगितलें कीं, आपल्या माहितींत असलेल्याची आणि देवालयांच्या मालकीची जी जी जमीन होती, तिची आपण माहिती दिली असून याशिवाय आपणास माहिती नाहीं. त्या जमिनींचे भोगवटदारच त्यांच्या जमिनींत कांहीं भाग जर देवालयांच्या भोगवटीचे असतील तर ती माहिती तेच देऊं शकतील, असें त्यानें साक्षीदारांसमोर सांगितलें. त्या नंतर तेथें हजर असलेल्यांनी सांगितलें:-

-"करंबळाचे आक" नांवाच्या शेताचा एक तुकडा. "शेत व्हांव" नांवाच्या शेताचा एक तुकडा. "गुआरीचो वरको" नांवाच्या शेताचा एक तुकडा.

-आणखी सांगितलें कीं, फोरैरुस म्हणजे भोगवटदार प्रतिवर्षीं देवालयांस पंचवीस "ग्वालोइस" (कोंबडे?) अर्पण करीत असत.

-सांतेरी देवालयास प्रतिवर्षी तीन बरगणी फुलांची पूजा करण्यासाठीं देत असत. त्याच प्रमाणें पंचवीस बांदी दोन बरगणी इतकी रक्कम देवालयास एक छत्री विकत आणण्यासाठीं वसूल करीत असत.

-खाऱ्या पाण्यानें भिजविलेल्या शेत जमिनीच्या वांटणीचे वेळीं एका बकऱ्याचा बळी देत असत.

-फणसाचीं झाडें तीन असलेली, एक लहान जमीन, किंमत नसलेली.

-"सटियाचे" नांवाची जमीन याची किंमत २५ पताका व फोर तीन बरगण्या ठरविण्यांत आला.

-"आनेसिनाची ठाण' नांवाची जमीन कोणीच भोगवट्यांत आणीत नसलेली चंडू कामत यांच्या कुळागरांत असलेली.

-सोमण याच्या कुळागरांत असलेलें अगदीं लहान देवालय "शामसीमा."

-म्हाबळा पडियार याच्या जमिनींत एक देवालय मोडक्या स्थितींत.

-विठ्ठल भांडारी याच्या कुळागरांत एक लहानसें दगडी चिऱ्यांचें घर जें मदोबा उपभोगीत आहे.

-शेवटीं सांखवाळ गांवच्या गांवकार आणि इस्क्रीव्हांव (ग्रामलेखक) या सर्वांनीं प्रमाण पूर्वक शपथेवर सांगितलें कीं, या पंचनाम्यांत सादर केलेल्या शिवाय आणखी जमिनी देवालयाच्या किंवा त्यांच्या सेवेकऱ्यांच्या नाहींत. ज्या वर उल्लेखिलेल्या आहेत त्या देवालयांच्या "नमशी" आहेत, हें ऐकून घेऊन जज्ञ साहेबांनीं हा तेर्मु (पंचनामा) लिहिण्यास सांगितल्या प्रमाणें तो पेरु कोर्नेजु या इस्क्रीव्हांवानें लिहून त्यावर उल्लेखित जज्ञ, भाषांतरकार, आणि प्रारंभीं उल्लेखिलेले, सर्वांनी सह्या केल्या आहेत. - सांतू भांडारी- ओझो शेणवीं - गुणू शेणवीं, - नरसू नाईक - म्हाबळा शेणवीं - कृष्ण नाईक - विठ्ठल भांडारी - देव भांडारी - अंता कामत - नरसू कामत - गुणू भांडारी - रामू शेणवीं - सांतू कामत - म्हाबळा नाईक - अनू शेणवीं - पद्मा शेणवीं - इस्क्रीव्हांव - गास्पार फ्राझ - बाल्ताझार दियस - जुवांव कुतींन्यु - जोर्ज दे मिनेझिस - आंब्रोझियु दे सौज.

मूळ पंचनामा, जो पोर्तुगीज भाषेच्या जुन्या लिपींत सरकारी गोवा पुरातत्व खात्याच्या ऐतिहासिक दप्तरांत आढळतो, त्याची अस्सल कॉपी जरी येथें दिली तरी सद्यःकालांतील पिढीच्या वाचकांस ती वाचणें आणि समजून घेणें सोईस्कर नाहीं. शिवाय, स्थलाभावामुळें तें अशक्य झालें. म्हणून जिज्ञासू वाचकांच्या उत्सुकतेसाठीं शक्य तों मराठी भाषेंत रूपांतर किंवा अनुवाद, त्यांतील महत्वाच्या गोष्टी सांभाळून देण्याचा प्रयत्नकेलेला आहे. तो समग्र बारकाईनें वाचणारांस निदान इतकी तरी माहिती मिळूं शकेल कीं, त्या देवस्थानांतील प्रत्येक दैवताच्या मालकीच्या जमिनी, त्यांचीं नांवें कोण दैवताचें देवालय कोणत्या जमिनींत त्या प्राचीन कालीं होतें, जमिनींच्या भोगवटदारांच्याजबाबदारीचीं प्रतिवार्षिक कर्तव्यें कोणतीं होतीं, प्रतिवार्षिक आंवळी भोजना सारखे उत्सव, दिंडी उत्सव, चारशें पंचवीस वर्षांपूर्वीच्या कालांतही होत असत, शेत जमिनींत खारें पाणी शिरलेल्या जमिनींची विभागणी, बकरा बळी देण्याचा प्रकार अशासारख्या चालीरिती सव्वाचार शतकां पूर्वी चालू होत्या आणि देवालयांच्या

इमारतीचीं छप्परें कौलांशिवाय होतीं व तीं प्रतिवर्षीं चुडतांनी शाकारणी करून सांभाळीत असत. सार्वजनिक भोजन संतर्पण, त्यास लागणारे तांदुळ, नारळ, देवालयांत दिवे प्रज्वलीत करण्यासाठीं तेलाची वार्षिक व्यवस्था, इतकेंच नव्हे, तर संन्यासी, जोगी, अशा सत्पुरुषांच्या समाधीस्थानांकडे नंदादीपाची व्यवस्था केली जाई, आणि हें सर्व, सबंध गांवाच्या जमिनींच्या उत्पन्नांतूनच गांवकरी देवालयांची सर्व जबाबदारी व खर्च संपूर्णपणें करीत असत, याचे स्पष्ट पुरावे या पंचनाम्यांत पाहून त्या प्राचीन कालची ही अशी कायम सुरळीतपणें चालणारी दैनंदिन व्यवस्था पाहून, तत्कालीन ग्रामीण जनतेची तारीफ करावी तितकी थोडीच असें वाटल्यास नवल नाहीं.

## गोमांतकांतील देवालयांबद्दल विचारवंतांचा दृष्टीकोन.

गोमांतकांतील देवालयें हीं केवळ अंधश्रद्धेनें पूजा किंवा प्रार्थना करण्याचीं स्थानें नसून, त्यांच्या वैशिष्ट्यांमुळें तीं अद्वितीय आणि अनुपम संस्थारूप आहेत असें विचारवंत मानतात.

जगांतील प्राचीन संस्कृतींत भारतीय संस्कृतीची आणि अर्थात त्यांत गोमंतकीय संस्कृतीची गणना होते. त्या संस्कृतीचीं प्रतिकरूप हीं देवालयें आहेत. भारतीय संस्कृतीची प्राचीन काली केवढी प्रगती झाली होती, हें ज्या साधनांनीं जोखलें जातें, त्यापैकीं गोमांतकांतील देवालयें हीं महत्त्वाचीं साधनें आहेत.

देवालयें जो मूकपणें इतिहास सांगत उभी आहेत, तो जाणून, समजावून घ्यायची अत्यंत आवश्यकता आहे. आपले अतिप्राचीन ग्रंथ कंठस्थ करून किंवा ताडपत्रावर लिहून सांभाळले गेले. त्यामुळें त्यांत भर पडण्याची व काहीं भाग गळण्याची शक्यता होती. मोठमोठे सम्राट चक्रवर्ती होऊन गेले; त्यांचीं सम्राज्यें नष्ट झालीं; लुप्त झालीं. तथापि, त्या सर्वांनी बांधलेलीं देवालयें आजवर टिकलीं आहेत.

गोमांतकांत इसवी सनाच्या सोळाव्या शतकांत तत्कालीन राज्यकर्त्यांच्या ख्रिस्ती धर्म प्रसाराच्या बळजबरी अमानुष धोरणामुळें तिसवाडी, सासष्टी आणि बारदेस या तालुक्यांतील देवालयांचें स्थलांतर करण्याचा दारुण प्रसंग ओढवल्यामुळें त्या देवालयांचेंस्थलांतर तत्कालीन राज्यकर्त्यांच्या राज्य सरहद्दीबाहेरच्या परकीय राज्यांत संबंधीत देवालयांच्या कुळावी भक्तांनी केलें आणि तेथें आपापलीं दैवतें पुनर्स्थापित केलीं हें इतिहास सांगतो. जेथें जेथें तीं दैवतें पुनर्स्थापित केलीं, तेथें तेथें आमच्या पुण्य पुरुष पूर्वजांनीं सर्व प्रकारचा स्वार्थत्याग करून जीं नवीन देवालयें बांधलीं, तीं आजवर टिकलीं आहेत. आणि तीं त्या कालच्या भारतीय आणि त्यांतल्या त्यांत गोमंतकाच्या संस्कृतीची गुणगाथा गात आहेत. एवढीं भव्य, आकर्षक, व नयनरम्य देवालयें त्याकाळीं बांधण्यांत आलीं, म्हणूनच आपल्या संस्कृतीची महानता समजण्याची एक उत्तम संधी आपल्याला लाभली.

गोमंतकीय आणि अखिल भारतीय देवालयांच्या कालांतील अथवा त्या पूर्वींच्या कालांतील कांहीं शिल्पें, स्थापत्यें जगांत खचित आहेत. पण, भारतीय शिल्प स्थापत्याशीं तुलना करतां येईल असें शिल्प स्थापत्य कोठेंच आढळत नाहीं. खुद्द गोमांतकांत अशीं कांहीं शिल्पें -स्थापत्यें आहेत विशेषतः देवालयें- कीं, ज्यांचा पाश्चिमात्य कला रसिकांनीं व स्थापत्यकारांनीं, मोकळया मनानें, आणि मुक्त कंठानें त्या देवालयांची, शिल्पाची व स्थापत्याची प्रसंसा केलेली आहे.

यावरून गोमंतकीय शिल्पकार व कलाकार किती उच्च दर्जाचे असले पाहिजेत याची कल्पना येते. ते स्वतःच्या कल्पनाशक्तीपेक्षां परंपरेनें चालत आलेल्या मान्यतांशीं अधिक प्रामाणिक होते- अहंमाला विसरले होते. म्हणूनच, अशा महान् आश्चर्यकारक कलाकृती निर्माण करुनही स्वतःचीं नांवें त्यांनी सहसा गोमांतकांत कोठेंही कोरलेलीं नाहींत.

गोमंतकीय देवालयांत भव्यता, प्रमाणबद्धता, सौंदर्य आणि कालौघांत टिकून राहाण्याची शक्ती, यांचें अद्‌भूत मिश्रण आहे. शिवाय, गोमंतकीय देवालयें बांधण्यामागची भूमिकाही फार भिन्न होती. आपल्या संस्कृतीचें खास वैशिष्ट्य जी सहिष्णुता ती त्याच्या पाठीशीं होती.

गोमंतकांतील देवालयें जबरदस्तीनें पकडून आणलेल्या गुलामांकडून अथवा वेठीला धरलेल्या गोरगरिबांकडून बांधलेलीं नाहींत. गोमंतकीय देवालय बांधणीचा इतिहास क्रौर्यानें माखलेला नाहीं, तर मांगल्यानें, प्रसन्नतेनें लिहिलेला आहे.

गोमांतकांत जीं देवालयें सध्या उभीं दिसत आहेत, तीं बहुतेक सर्वच इसवी सनाच्या शतकानंतरचीं आहेत. गोमांतकांतील अतिप्राचीन देवालयें आणि त्यांतील मूर्तीभंजन मुसलमानांनी केलें. त्यानंतरच्या कालांत ख्रिस्ती धर्मियांनीं केलें. त्यामुळें सवंच शिल्पाकृती नष्ट झाल्या. या सर्वांच्या अत्याचारांतून थोडींशीं वांचलेलीं देवालयें प्राचीन गोमंतकीय शिल्पकलेचा इतिहास सांगायाला उभीं आहेत.

शिल्प स्थापत्यांत गोमंतकीय शिल्पकारांनी साफल्याचा

जो उच्चांक साधला, त्याचें वर्णन करायाला शब्द थिटे पडतील. गोमंतकांतील देवालयाची शिल्पकला धार्मिक असूनही जीवनापासून दूर जाणारी नाहीं. शिवाय, निराशावादी नव्हती व नाहीं. आनंदमय अवस्थेंतील आशावादी होती; म्हणूनच देवालयांत किंवा देवालयाबाहेर कोरलेल्या देवता, संत, साधू इत्यादि सारे हंसतमुख व मौल्यवान वस्त्रें व दागदागिनेही धारण करणारे होते. त्या कालांतील समाजाला जशा प्रकारच्या शक्तीची जरुरी होती, त्या शक्तीच्या प्रतिक रूपानें देवता निर्मिलेल्या होत्या.

गोमांतकांतील देवालयाच्या शिल्पाची व स्थापत्याची रचना पूर्वींपासूनच गृहप्रासादाहून भिन्न असायची. देवालयाचें तें उत्तुंग शिखर आसमंतावर सर्वप्रकारें प्रभुत्व गाजवायचें आणि स्वतःच्या अस्तित्वाची जणूं कांहीं जाणीव द्यायचें.

मूर्तीपूजेला प्राधान्य मिळाल्यानें देवालयें बांधलीं गेलीं. त्यामुळेंच गोमांतकांत शिल्पकला, स्थापत्यकला, चित्रकला, रंगकला, गायन, वादन, नृत्य, विणकाम, धातुकाम, वगैरे कलांना उत्तेजन मिळून त्या विकास पावल्या. देवालयांच्या आश्रयानें शिक्षणाचा विकास झाला.

त्याकालीं, पाठशाळा देवालयांत किंवा त्याच्या आवारांत, त्याच्या आश्रयानें चालविल्या जात. प्रवचनें, धर्मसभा, चर्चा आयोजिल्या जात. मोठीं देवालयें, जीं मागाहून तीर्थस्थानें बनलीं, तीं शेंकडों वर्षें विद्यापीठें, ज्ञानपीठें होतीं. राजाकडून, धनिकांकडून देणग्या, दान, वतनें मिळत.

देवालयें, गोमांतकांत तरी, त्या धनामुळें गावांत आणि शेजारच्या परिसरांत, बँकांप्रमाणें गांवकऱ्यांना आणि गरजूंना उपयुक्त होत. पुजारी, अभिषेकी, पुराणिक, कथेकरी, जोशी, वादक, नर्तक शिक्षक, माळी, कुळकर्णी, शिंपी, धोबी, सुतार, सुवर्णकार, सोनार, लोहार, नाभिक, महार, चांभार वगैरेना देवालयाच्या आश्रयानें कामकाज मिळत असे. उत्सवाच्या निमित्तानें आजूबाजूच्या परिसरांतील लोकांचें एक प्रकारचें संमेलन भरायचें.

श्रीलक्ष्मीनृसिंह देवालयाचें शिल्प आणि स्थापत्य रचना पाहिल्यानंतर तो नमुना आणि वैशिष्ट्य लक्षांत येतें आणि त्या शिल्पकारांचें कौतुक करावें तेवढें थोडेंच, असें निःसंशयपणें वाटतें. देवालयाचें शिखर, खालीं तळाशीं चौकोनी, त्यावरचा भाग अष्टकोनी, नंतर लिंगाकृति व शेवटचा भाग केळीच्या घडाच्या टोंकाला बोंडी असते, त्या बोंडीच्या आकाराचा. देवालयाच्या आंतल्या भागांत मंडपापासून चौकापर्यंत असलेले आठ लांकडी भक्कम खांब, छत, या मधल्या दोन्ही चौकोनांच्या चारही बाजूंस,तसेंच दोनही सरवळींत वरच्या बाजूस, जुन्या कालांत केलेलें कोरीव काम, त्यांत लांकडी उठावाच्या सुंदर कोरीव मूर्ती देवादिकांच्या; पुराणकालीन नानाविध प्रसंग, दशावतारांचीं चित्रें, वगैरे लांकडी प्रतिमा, अशा प्रकारचें कोरीव काम म्हणजे संस्कृतीची परंपरा पाहून आणि तें कोरीव काम करणारे फार मोठे कलावंत कारागीर विरळेच आहेत याची जाणीव होते.

वरील सर्व दृष्टीकोनांतून गोमांतकांतील देवालयांचें महत्त्व सामाजिक दृष्टीनेंही अतिमोलाचें खचित होतें, व अद्यापही कांहीं अंशीं निश्चितपणें आहे, याची जाणीव मनांतून सर्वांनाच आहे. औद्योगिक युगापूर्वींच्या कालांत, देवालयाचें गांवावर जें प्रभुत्व असावयाचें, त्याच अर्थानें, देवालयें गोमंतकीय संस्कृतीचीं धामें आहेत असें मानण्यांत येतें व तें योग्यच आहे. देवालयें हीं अडगळीचीं स्थळें आहेत, आजच्या युगांत यांचें महत्त्व नाहीं, असा विचार मांडणारांनीं गोमांतकीय देवालयांची जमेची आणि लाभाची बाजू मुद्दाम लक्षांत घ्यायला हवी.

प्रत्येक पिढी आपल्या संस्कृतीची मशाल पुढच्या पिढीच्या स्वाधीन करून जात असते, आणि ही मशाल तेवत ठेवून व काळजीनें अधिक प्रदिप्त करून सावधानीनें भावी पिढीच्या हातांत, जरी पूर्वींपेक्षां अधिक तेजस्वी नसली, तरी कमींत कमी, आपल्याला मिळाली होती, त्यापेक्षां कमी तेजस्वी न करतां देणें, हें प्रत्येक पिढीचें कर्तव्य आहे.

## वेलिंग येथील श्रीलक्ष्मी-नृसिंह देवस्थानांतील मुख्य दैवत आणि परिवार दैवतें.

वेलिंग गावांत सदर देवस्थानांतील मुख्य दैवत श्रीलक्ष्मी-नृसिंह हें असून, श्रीसाधन नृसिंह (पुरुष), श्रीपायक, भांडारी, श्रीब्रम्हा व श्रीमारुती हीं परिवार दैवतें आहेत.

### शिबिकोत्सव.

या देवस्थानांत नियमितपणें प्रत्येक महिन्याच्या शुक्ल पक्षांत, चतुर्दशी तिथी दिवशीं, रात्रौ दहा वाजतां, शिबिकोत्सव (पालखी उत्सव) होत असतो. या उत्सवाच्या मिरवणुकींत पालखीचीं एकंदर नऊ पेणीं (मुक्काम) होत असतात.

### कौल प्रसाद.

प्रसाद पूजा शिलेस लावतात व ती करंबलीच्या

झाडाच्या पानांचे तुकडे करून ते प्रसाद त्या शिलेस बावन्न ठिकाणीं लावतात. प्रत्येक महिन्याच्या शुक्ल आणि कृष्ण एकादशी दिवशीं, अमावास्या तिथीस कार्तिक महिन्याच्या शुक्ल प्रतिपदा आणि पौर्णिमा तिथी दिवशीं, हे प्रसाद घेत नसतात.

सूर्य किंवा चंद्रग्रहण आल्याच्या दिवशीं, तसेंच संक्रांती दिवशींही, प्रसाद घेण्याची वहिवाट नाहीं.

## पालवी दैवतें आणि त्यांचीं देवस्थानें.

''श्रीशांतादुर्गा'' गोठण आणि ''श्रीविजयादुर्गा'' केरी हीं पालवी दैवतें असून त्यांचीं देवस्थानें अनुक्रमें गोठण आणि केरी या दोन गावांत फोंडा तालुक्यांतच आहेत. श्रीलक्ष्मी-नृसिंह देवस्थानच्या कुळावी महाजनांना या दोनही पालवी देवस्थानांना भेट द्यावी लागते. कारण, तीं तीनही दैवतें आणि त्यांचीं देवालयें, प्राचीन कालीं सांखवाळ येथें असतांना एकत्रित होतीं. श्रीनृसिंह दैवतास अभिषेक केला म्हणजे गोठणास श्रीशांतादुर्गा देवीस आणि केरीस श्री विजयादुर्गा देवीस ही अभिषेक करण्याची वहिवाट आहे.

## देवस्थानचे आद्य संस्थापक-कुळावी महाजन.

स्थलांतरपूर्व कालीं, हें देवस्थान सांखवाळ येथें असताना, सांखवाळ ग्रामसंस्था पुरातन कालीं ज्या लोकांनी स्थापन केली, त्याच लोकांनी हें देवस्थान स्थापन करून त्या देवस्थानचा सर्व एकंदर खर्च त्या ग्रामसंस्थेच्या उत्पन्नांतूनच होई. त्या ग्रामसंस्थेचे एकंदर आद्य संस्थापक भागीदार गांवकार त्यांचे चौदा वांगड होते, त्या गांवकार कुटुंबांचीं तत्कालीन उपनांवें सिनाय (शेणवीं), भांडारी, नाईक (नायक), कामोतीं (कामत), आणि पडियार अशीं होतीं. ही माहिती त्या ग्रामसंस्थेच्या म्हणजे कोमुनिदादीच्या फार प्राचीन दप्तरांतील कागदपत्रांवरून कळते. दैवतें सांखवाळ येथून स्थलांतर करून तत्कालीन परकी राज्यांत फोंडा तालुक्यांत नेलीं गेलीं. त्या भयानक संकट कालांत, देवस्थानची सर्व मालमत्ता आणि उत्पन्न यांवर तिलांजली देऊन यावें लागलें. सांखवाळ ग्रामसंस्था किंवा कोमुनिदादीकडून या देवस्थानचा, वेलिंग येथें त्याच्या स्थापनकालापासून खर्च करण्याचें कायमचेंच बंद झालें, आणि ज्या कुळावी महाजनांनीं तें दैवत वेलिंग येथें पुर्नस्थापितकरून तेथें देवालय बांधलें, त्याच कुळावी लोकांवर देवस्थानचा एकंदर सर्व खर्च करण्याची जबाबदारी पडली, आणि त्यांनी अव्याहतपणें सोंसली आणि ते सोसतच आहेत - ही वस्तुस्थिती उघडपणें, त्या देवस्थानची सद्यःस्थिती आणि नेत्रदीपक विकास कार्य, नवीन इमारतीचीं बांधकामें इत्यादि सर्व पाहिल्यावर सहजपणें लक्षांत येते.

या देवस्थानचे आद्य संस्थापक महाजन फक्त गौड सारस्वत ब्राम्हण, ज्यांचें गोत्र ''शंख पिंग कुत्स'' आहे, तेच आहेत.

जुन्या कालीन, या देवस्थानच्या दप्तरांतील कागदपत्रांवरून, या देवस्थानच्या कुळावी महाजनांचीं उपनांवें जीं कळतात तीं अशीं:-

नायक - भांडारी - सांखोलकर - शंखावलीकर - संखवाळकर - शेणई - प्रभू - पडियार; - पण, आजच्या कालांत उपनांवातील बदलस्थित्यंतरें, ज्या गावांत वास्तव्य करून रहातात, त्या गांवाचें उपनांव, व्यवसाय, धंदा किंवा वतन यावरून उपनांवाची ओळख अशा नानाविध प्रकारांमुळें आणि विशेषेंकरून हल्लींच्या कालांत आपल्या देवस्थान किंवा कुटुंबाचे वांगडांत दर्शविलेल्या उपनांवाचा वापर करण्याचें सध्याच्या पिढीनें दुर्लक्षिल्यामुळें, त्याचे दुष्परिणाम अनेक ठिकाणीं अनुभवास येऊं लागल्याचीं उदाहरणें दृष्टोत्पत्तीस येतात. सध्याच्या कालांत त्या देवस्थानच्या दप्तरांत जी नोंद आहे, त्या नोंदीनुसार खालील उपनांवांचे गौड सारस्वत ब्राम्हण ज्ञाती समाजाचे कुळावी महाजन त्या देवस्थानचे आहेतः-

आचार्य - नायक - नायक दलाल - नायक सुकेरकर - शेणवी वळवटकार - नायक पानवेलकार - बोंडकार - भांडारी - भांडारकर - भांडगांवकर - भट्ट - कुळकर्णी - मंगलोर - पडियार - प्रभू - साखोलकर - सोमपूरकर - तेंबूलकर - तळवडकर - उभयकर - उल्हाळ - सांखोलकर - वेलिंगकर - वेणुगोपाल - अमनबोल - राव - सोमापूरकर - साखवालकर - साखळकर - अलदनगिरी - कुडियाडी - अमेंबल - हर्लीकर - मुजुमदार - सांखळकर - तेलवडकर - मंजेश्वर - शणैया - कुंब्ला, कुमालकर - शेणै - तळवडेकर - कुळकर्णी तळवडेकर.

सांखवाळकर या उपनांवाच्या महाजनांत, शेणवीं सांखवाळकर, नायक सांखवाळकर व कामत सांखवाळकर अशा वेगवेगळया नांवाचे आढळतात.

## देवस्थान मालकीच्या जमिनीः

वेलींग गावांत श्रीलक्ष्मी-नृसिंह देवस्थानच्या मालकीच्या कांहीं जमिनी आहेत त्या पुढील प्रमाणें:-

१) प्रेदियु देनोमिनादु ''बोरचें भाट.'

२) प्रेदियु देनोमिनादु ''स्थल कुटुंबण.'' ही जमीन फोंडा तालुक्याच्या फाझेंद ऑफिसांत म्हणजे आजच्या तालुका रेव्हेन्यु ऑफिसांत ''मात्रीज प्रेदियाल दे वेलिंग'' या बुकावर नंबर २५४ वर देवस्थानच्या नांवावर

रजिस्ट्रेशन केलेलें आहे.

३) प्रेदियु देनोमिनादु "जोगळया भाट"

याशिवाय, वेलिंग गांवच्या कोमुनिदादींतून म्हणजे ग्रामसंस्थेकडून या देवस्थानास वार्षिक हक्क या नांवानें प्रतिवर्षी सोळा रुपये दहा पै ही रक्कम येत असते.

### देवस्थानांत प्रतिवार्षिक उत्सव.

या देवस्थानांत, गोमांतकांतील प्रमुख देवस्थानांत होत असतात त्या प्रमाणेंच शिबिकोत्सव, रंगपूजा, वसंतपूजा, लालखी-उत्सव, रथोस्तव, संतर्पण, समाराधना वगैरे प्रतिवर्षी होत असतात. चैत्र महिन्यांत पंचांगश्रवण, श्रीरामवमी, वैशाख महिन्यांत अक्षय्य तृतिया, भाद्रपद महिन्यांत श्रीअनंतव्रतोत्सव, आश्विन महिन्यांत नवरात्र, मखरोत्सव, कार्तिक महिन्यांत श्रीतुलसी-विवाह, काला, गोपालकाला, रथोत्सव, दीपाराधना, दीपस्तंभ प्रज्वलित करणें, हरिजागर, मार्गशीर्ष महिन्यांत श्रीदत्तजयंती उत्सव, माघ महिन्यांत सुंवारी वादन, रथोत्सव, लालखीउत्सव, फाल्गुन महिन्यांत होलिकोत्सव असे नानाविध कार्यक्रमांसह उत्सव होत असतात, त्या सर्व उत्सवांची नोंद आणि ते कोणत्या महिन्यांत साजरे केले जातात ही सविस्तर माहिती येथें स्थलाभावामुळें देणें कठीण आहे. या देवस्थानांत दैनिक सदावर्त होण्याची कायम व्यवस्था केलेली आढळते हें विशेष होय.

### श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठ आणि श्रीलक्ष्मी-नृसिंह देवस्थान.

श्रीलक्ष्मी-नृसिंह देवस्थानच्या धार्मिक बाबींसबंधीं सर्व अधिकार श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाचे श्रीस्वामी महाराज यांकडे असून त्यानीच सर्व धार्मिक खटले किंवा अडचणींचा निवाडा करावयाचा आणि या देवस्थानच्या महाजनांकडून अक्षरशः पाळण्यांत यावयाचा असतो. (देवस्थानच्या नियमावलींत म्हणजे कोंप्रोमिस्सांत कायदेशीरपणें अशा आशयाचें स्पष्ट कलम आहे. कलम ३३ पहा.)

श्रीमठ पर्तगाळ किंवा श्रीमठ कवळें येथील धर्माध्यक्ष श्रीस्वामी महाराजांची स्वारी या देवस्थानांत पोंचेल किंवा येईल त्यावेळीं, त्यास या देवस्थानची कारभारी मंडळी किंवा त्यांचे जागीं असतील त्यानें, अगर देवस्थानचा पुजारी भटजी यानी, एकंदर मानमरातबानें वहिवाटीचे जागीं, इलामत, वाद्यगाद्यदि योग्य त्या सरंजामासह सामोरें जाऊन त्या श्रीस्वामीजींचें श्रद्धापूर्वक योग्य त्या रितीनें आदरातिथ्य केलें जावें, असेंही स्पष्ट कलम ३२ त्या उल्लेखित नियमावलींत आहे.

### देवस्थानची घटना नियमावली.

श्रीलक्ष्मी-नृसिंह, वेलिंग, देवस्थानची घटना नियमावली, जिला कोंप्रोमिस्सु असें म्हणतात, ती गोवा सरकारनें आपल्या पोर्तारीय नंबर ५५३ हुकुमानें पास करून मंजूर केली आहे. आणि ती सरकारी गॅझेट- बोलेतीं ओफिसीयाल, ता. १९ डिसेंबर सन १९११ सालच्या अंकांत प्रसिद्ध झालेली आहे. या नियमावलीची कॉपी पोर्तुगीज भाषेंत, आणि तिचें मराठी भाषेंत भाषांतर, मोडी लिपींत, त्या देवस्थानच्या दप्तरांत आहे.

✽✽

# गोंयांत कदंबांची राजवट

शणै वा. र. वर्दे वालावलीकार

*कै. वामन रगुनाथ वर्दे वालावलीकार उर्फ शणै गोंयबाब हाणी गोंयच्या इतिहासाचेर खूब संशोधन केल्लें आसा. गोंयकारांच्यो गोंयाभायल्यो वसणुको आनी गोंयांतल्या भायल्या राजवटीचेर उजवाड घालपी तांच्या 'गोंयकारांची गोंयाभायली वसणूक' ह्या तांच्या मोलादीक पुस्तकांतल्यान 'गोंयांत कदंबाची' राजवट हो लेख आमी हांगा दितात.*

आठव्या शेंकड्याचे मजगतीपासून इकराव्या शेंकड्याच्या आरंभाचीं कांय वर्सांमेरेन गोंयां शिलाहारांचें राज्य चलतालें. हे राजा वेदधर्मी आसून म्हादेवाक भजताले. हांच्या वंशांतलो निमाणो राजा रट्टराज हाका इकराव्या शेंकड्याच्या पैल्या चौथ्यांत हळसीकार कदंब राजा पैलो षष्ठदेव हाणें जिखून सगळें दक्षिण कोंकण आपल्या शेकातळा हाडलें. शिलाहार आनी कदंब हे दोनूय वंश आदीं राष्ट्रकूट आनी मागीर चालुक्य सम्राटांचे मांडलीक आसले. विसाव्या शेंकड्यांतले हिंदुस्तानांतले आतांचे मांडलीक आनी हजार वर्सांफाटले पुर्विल्ले मांडलीक हांचे भितर आकास-पाताळामदलें अंतर आस. आतांच्या मांडलिकांक, माथ्यावैल्या इंग्रज सरकाराचे मान्यतायेन दरेक पावल घालूंक जाय. पुर्विल्ल्या मांडलिकांची गत इतली परतंत्र नासली. ते बेष्टे नांवाचे मांडलीक आसून तांची स्वतंत्रताय मोटी आसली. माथ्यार सम्राट आसतानाय ते एकमेकांकडेन झुजताले आनी एकामेकांची भुंय हातासताले. केन्ना केन्ना एक बळिष्ट मांडलीक दुसऱ्या सुमाराकशा मांडलिकाक सत्तेभायरो करून ताच्या सगळ्या मुलखार आपलो शेक बसैतालो. तरी आसताना, सम्राट तांतूंत आपलो हात चडसो घालिनासलो. हळसीकार कदंब खासा मांडलीक आसताना, ताणें गोंयच्या रट्टराजाचें राज्य हातासून ताका सत्तेभायरो केलो, हाचें कारण, ते वेळच्या चालुक्य सम्राटान त्या मांडलिकांच्या वादांत आपलें आंग घालें ना हें जांवये. मांडलिकांचे हे स्वतंत्रतायेक लागून हळसीकार कदंब गोंयच्या शिलाहारांची भुंय हातासूंक जायत्या काळापासून वावुरताले. ह्या शिलाहारांचो मूळपुरुस शणफुल्ल म्हणपाचें पैल्या उलौपांत आयलांच. ताचो नातू ऐयपराज हाच्या वेळापासून म्हणचे णववो शेंकडो लागत्यार, कदंब त्या कामाक लागिल्ले अशें दिसता. ऐयपराज गोंयां रावन दक्षिण कोंकणाचें राज्य चलैतालो तेन्ना कोणेंय हळसीकार कदंबान चंद्रपुराचेर (चांदराचेर) घुरी घाली जांवये; कित्याक, थैं जाल्ल्या झुजांत ऐयपराज नाल्लांचें उदक न्हालो, म्हणचे ताका जैत मेळळें अशें क्रि. स. १००८ च्या तांब्या-पट्यांत म्हळां.[१] परंत ह्या अपेसान निर्शेवन कदंबांनीं शिलाहारांच्या राज्याचो नाद सोडून दिलो, अशें दिसना. ताणीं त्याच शेंकड्याचे मजगतीं, चांदर हातासून चंद्रवाडी आनी तिचे उत्तरेकडच्या गोंयच्या कांय म्हालांचेर आपलो शेक बसैलो आनी चांदर हें आपलें राजपाटण केलेंशें दिसता. कित्याक, ऐयपराजाचो पण्टू दुसरो अवसर हाणें चांदराच्या राजाक पालव दिलो अशें वैल्या तांब्या-पट्यांत म्हळां.[२] हाचेवैल्यान आपल्या शत्रूकूय प्रसंगाक उपकारा पडूंक गोंयचे शिलाहार चड उदार आसले अशें दिसता. परंत हें उदारपण जायते काळ तगलें ना. दुसऱ्या अवसराचो नातू भीम हाणें धाव्या शेंकड्याचे मजगतीं राहू जसो चंद्राक गिळटा तशें चंद्रमंडल

१ Epig. Ind., vol. 3. p. 299

२ तस्मादवसरो जातो जितारिर्धर्मवान्नृपः । चेमूल्यचंद्रपुरजक्ष्माभृत्साहाय्यमदाद्यः॥ Epig. Ind., vol 3, p 299.

(चंद्रवाडी) गिळ्ळें. परंत कांय वेळान गिराण सुटून चंद्र जसो मेकळो जाता तशीच चंद्रवाडीय शिलाहारांच्या हातांतसून रोखडीच मेकळी जाली जांवये. निमाणें, भिमाचो नातू रट्टराज हाका इकराव्या शेंकड्याच्या पैल्या चौथ्यांत पैल्या षष्ठदेव कदंबान जिखून ताचें सगळें राज्य म्हणचे दक्षिण कोंकण घेतलें. कदंबानीं चंद्रवाडी घेवन चंद्रपुर हें आपलें राजपाटण करीतपासून तांकां चंद्रपुरचे कदंब हें नांव पडलें. जैन आचार्य हेमचंद्र हाणें बाराव्या शेंकड्यांत रचिल्ल्या द्व्याश्रय काव्यांत षा[illegible]ो पुत पैलो जयकेशी हाका चंद्रपुरचो कदंब म्हळा.[३] ऐयपराज धरून रट्टराजामेरेनच्या शिलाहारांकडेन एकसारकीं दोनशीं वर्सां जे कदंब झुजले तांचीं नांवां तांब्या-पट्यांनीं दिंवक नात; परंत षष्ठदेव कदंबाचो बापुय वागमारो गूहल्ल आनी ताचो मूळपुरुस जयंत हांचे मजगत जायते राजा जाले अशें क्रि. स. १२४७ च्या गोंयच्या एका तांब्या-पट्यांत म्हळां.[४] तांचीं नांवां दिंवक नात; तरी, गोंयच्या शिलाहारांकडेन झुजणे कदंब जयंताचेच पिळगेंतले कोणूय आसतले.

कदंब हे मुदलचे वेदधर्मी आसून मदीं ताणीं जैनधर्म घेतलो आनी पर्थून आसतशे ते वेदधर्मी जाले म्हणपाचें सिद्ध करूंक पाशाणा-बरपांनीं आनी तांब्या-पट्यांनीं पुरावे मेळटात. त्रिपुर दैत्याक मारून जैत जोड्डकूच म्हादेवाच्या कपळावैल्यान घामाचो एक थेंबो कळमाच्या रुखाच्या आळयांत पडलो आनी ताचेपासून तीन दोळयांचो आनी चार हातांचो जयंत जल्मलो अशें वैर सांगिल्ल्या १२४७ वर्साच्या एका तांब्यापट्यांत म्हळां.[५] तशेंच ताचे पिळगेन अठरा अश्वमेध केल्ले अशें क्रि. स. ११८७ वर्साच्या एका तांब्या-पट्यांत म्हळां[६] हाचेवैल्यान कदंब मुदलाक वेदधर्मी आसले म्हणपाचें सिद्ध जाता. कदंब हें नांव तारखावळीच्या उजवाडांत पैलेंवैलेंच आइल्लें आमकां ऐहोळच्या क्रिस्तांव स. ६३४ च्या बरपांत वाचूंक मेळटा. तांतूंत म्हळां कि बादामीचो चालुक्य राजा पैलो कीर्तिवर्मा हाणें कदंबांचो बळिष्ट वंशरुख हाणून उडैलो[७] कीर्तिवर्मा सव्या शेंकड्याच्या दुसऱ्या अर्दांत राज्य चलैतालो. हाचेवैल्यान, चालुक्यांनीं आपली सत्ता थापचे आदीं म्हणचे सुमार पांचव्या शेंकड्यांत आनी सवो शेंकडो लागत्यार, कदंबवंश जायतो तरतरतालो अशें दिसता. ह्या वंशाचीं तीन घराणीं जावन गेलीं. परंत तांचीं बिरुदां चडकरून सारकींच आशिल्ल्या कारणान त्या तिगांयचें मूळ एक आसलें अशें दिसता. तांचो मूळगांव गोंयचे दक्षिण-पूर्वेक सुमार ६५ मैलांचेर उत्तर कर्णाटकांत वैजयंती वा वनवासी म्हण्टात तो. थैं पांचव्या शेंकड्याचे मजगतीं, मयूरशर्मा नांवाचो कदंब राजा राज्य चलैतालो. हाचे पिळगेचे कांय तांब्या-पटे उक्ताडाक आयल्यात. तांतूंत 'स्वामिमहासेनमातृगणानुध्यात' म्हणचे 'कार्तिकस्वामी आनी सात आवयो हांचें ध्यान करणे' अशी जरी कदंब राजांची वर्णना केल्या तरी भितर पैलेंवैलें आनी निमाणें नमन 'अर्हत्,' 'भगवान् जिनेंद्र' आनी तीर्थंकर[८] 'ऋषभ' हांकां आसून सगळो दानधर्म जैनधर्मी संस्थांक केला.[९] ह्या तांब्या-पट्यांवैल्यान सिद्ध जाता कि कदंबवंश मुदलचो वेदधर्मी आसून, उप्रांत जैनधर्मी जालो आनी नवो धर्म घेतला आसतानाय वेद धर्मातलें कार्तिकस्वामीचें नांव त्या वंशांतल्या राजांक सुटना जालें. कार्तिक स्वामीचे भक्तीक

३ अवाच्यां स्फरिकाशन्यस्ति नाम्ना चंद्रपुरं पुरम् । कडकस्फलकस्त्रेणं धर्मानुद्धिजितृप्रजम् ॥९९॥ दिशां प्रोर्गुविता कीर्त्या द्विषां प्रोर्णवितौजसा। राजेह जयकेशी यं स्तुतो वित्तश्च रोदसी ॥१००॥ कन्या जयति तस्यैषा मयणल्लेति नामतः । समीधेस्या न दध्वंसे कान्तिर्निन्ये जगन्मुदम् ॥१०१॥ चकाध्यवहितः श्रोतासि चेदेषा हि न : सखी । अनया द्योतयामाहे कदम्बकुलमुज्ज्वलम् ॥१५३॥ द्व्याश्रयकाव्य by हेमचंद्र, Bombay 1915, सर्ग ९.

४ अथ तस्य (जयंतस्य) कुले जाताः केपि भूपा महौजसः । कृतानेकमख ख्यातिविडंबितबिडौजसः ॥ Ind. Ant., vol. 14. p. 289.

५ पुरुमथनललाटस्वेदबिंदोः कदंबक्षितिरुहतलधात्रीसंगतादाविरासीत् । त्रिभुवननुतकीर्तिश्रीश्चतुर्बाहुरंचद् धनुरिषुफलकासिः श्रीजयंतरस्त्रिनेत्रः Ind. Ant., vol. 14 p. 289.

६ तस्याष्टादशवाजिमेधकृतिविख्यातेन्वये भूमिपा भूयांसो हि बभूवुः JBBRAS., vol. 9, p. 241.

७ नळमौर्यकदंबकाळरात्रिस्तनयस्तस्य बभूव कीर्तिवर्मा । रणपराक्रमलब्ध जयश्रिया सपदि येन विरुग्णमशेषतः । नृपतिगंधगजेन महौजसा पृथुकदंब-कदंब-कदंबकम् । Ind. Ant., vol. 8, p. 241

८ तीर्थंकर वा तीर्थकर ह्या उतराचो अर्थ जो पवित्र करता तो. जैन धर्मांत २४ तीर्थंकर जावन गेले अशें समजतात. सगळयांत पैल्या तीर्थंकराचें नांव ऋषभ आनी निमाण्याचें नांव वर्धमान महावीर. हो क्रिस्ता आदल्या सुमार पांचव्या शेंकड्यांत गौतम बुद्धाच्याच काळांत वावुरतालो. अर्हत्, भगवान्, जिन वा जिनेंद्र ह्यो पदव्यो तीर्थकरांक लांवची चाल जैन धर्मांत आस.

९ JBBRAS., vol. 9, pp. 235-240 and vol. 12, pp. 318, 319, 321 & 323.

सुमार चौथ्या शेंकड्याचे अखेरेक पालंव लागलें आनी सव्या शेंकड्याचे अखेरेमेरेन सुमार दोनशीं वर्सां त्या देवाची भक्ति हिंदुस्तानांत कडकडीत चलताली. सातवो शेंकडो लागत्यार, बादामीच्या चालुक्य राजांचे मुस्तींत दक्षिणेंत आनी चड करून कर्णाटकांत जैन धर्म जायतो मातलो; म्हण्टकूच, सव्या शेंकड्यांतूच तो थैं वैर सरूंक लागिल्लोसो दिसता; आनी त्याच सुमाराक कदंबांनीं तो धर्म घेतलो जांवये. तो धर्म बाराव्या शेंकड्याचे मजगतीमेरेन, लिंगायत मत्त वैर सरसर, जायतो तरतरून निमाणें शेळेलो. हळसीकार कदंब, इकरावो शेंकडो लागमेरेन जैनमत्त चलौन, उप्रांत पर्थून ल्हवुल्हवु वेदधर्मी जाले अशें दिसता. बाराव्या शेंकड्याचे मजगतीपासून तांचीं जीं बरपां मेळटात तांतूंत पैलेंवैलें नमन वराह, शिव, नृसिंह आनी शंभु हांकां आस.[१०] तशेंच त्या बरपांनीं 'श्रीसप्तकोटीश्वरलब्धवरप्रसाद' म्हणचे 'सप्तकोटीश्वर देवाच्या वराचो प्रसाद जोडिल्लो' आनी 'निजाराध्य श्रीसप्तकोटीश्वरदेव' म्हणचे 'आराधन करूंक फावोसो आपलो सप्तकोटीश्वर देव' अशीं उतरां कदंब राजांनीं घाल्यांत.[११] क्रि. स. १२११त प्रमोद संवत्सरांत तिसऱ्या जयकेशी कदंबान मारिल्ले भांगराचे पद्मटंक म्होरेचेर 'श्रीसप्तकोटीशलब्धवर विरजयकेशिदेव' हीं उतरां घाल्यांत.[१२] हो सप्तकोटीश्वर देव गोंयचो, दिवाडेवैल्या पोरणें नारवेंचो.[१३] पुर्तुगेजांच्या धर्मकोल्लाक लागून, क्रि. स. १५६० च्या स्त्रावण म्हैन्यांत, तीर्थाची अष्टम भरता त्या सुमाराक, जेजुइत भिस्प जुवांव नूनिज बार्रेत हाणें त्या देवाच्या देवळाचो चिन्यान चिरो निखळायलो आनी तेन्नापासून तो देव दिवाडेचे न्हंयेपलतडी, हिंदळयां देवूळ बांदून रावलो.[१४] हें देवूळ त्या वेळार मुड्डेवैले देसाय नारायणराव सूर्यराव हाणीं बांदलें खैं. सप्तकोटीश्वर थैं रावतपासून हिंदळयांचें नांव बदलून नवें नारवें, कोंकण नारवें वा निखटें नारवें हें नांव घोळणुकेंत आयलें आनी तें अजून चलता. परशुराम क्षेत्रांत पुर्विल्ले नामनेचीं म्हादेवाचीं जीं धा थळां आसत तांतूंत गोकर्णेच्या म्हाबळेश्वरासकला नारवेंच्या सप्तकोटीश्वराचें नांव सह्याद्रिखंडांत दिलां.[१५] पैल्या जयकेशी कदंबान इकराव्या शेंकड्याचे चाळिशीच्या सुमाराक, चांदर सोडून तीसवाडयेंतलें गोपकपत्तन (व्हडलें गोंय) हें आपलें राजपाटण करतकूच, नाजाल्यार एकाद्रो बारावो शेंकडो लागत्यार, सप्तकोटीश्वराची सासाय अणभवाक येवन, कदंबानीं त्या देवाक आपलो कुळदेव केलो जांवये. हे फोडणिशेवैल्यान, सव्या शेंकड्यापासून इकराव्या शेंकड्याचे अखेरेमेरेन, सुमार पांच-सशीं वर्सां, कदंबांची पिळगी जैन मत्त चलैताली म्हणपाचें उक्तें दिसता. ह्या मत्ताच्या कोल्लाक लागून, कदंबांकडसून गोंयच्या बामणांक पिडणूक भोगल्या म्हणपाचो पुरावो उत्तरकोंकणांतल्या शिलाहारांच्या इकराव्या शेंकड्यांतल्या बरपांनीं मेळटा.

पैल्या षष्ठदेव कदंबान गोंयच्या शिलाहारांचें राज्य हातासलें हें उत्तर कोंकणांतल्या शिलाहारांक सभाविक बरें दिसलें ना. त्याभायर कदंबांचो दोळो उत्तर कोंकणाचेर आसून तेंय हातासूंक ते वावुरताले. षष्ठदेवाचो पुत पैलो जयकेशी हाणें उत्तर कोंकणाचेर घुरी घालून थैंच्या राजाक जिवानशीं माल्लो अशें क्रि. स. ११७४ च्या एका पाशाणाबरपांत म्हळां.[१६] ही गजाल इकराव्या शेंकड्याच्या तिसऱ्या चौथ्यांत घडलीशी दिसता. मारिल्ल्या शिलाहाराचें नांव मुम्मुणि वा माम्वाणी अशें आसलें. हाचो पुतणयो अनंतदेव वा अनंतपाल हाचो क्रि. स. १०९४ चो एक

१० JBBRAS., vol. 9, pp. 241, 266, 278, 300, 307; Ind. Ant., vol. 14, p. 289.

११ JBBRAS., vol. 9, pp. 244, 269; Ind. Ant., vol., 14, p. 290.

१२ The International Numismata Orientalia by Sir Walter Elliot, p. 152c, plate 2, No. 71.

१३ गंगाया मध्यभागे तु क्षेत्रं दीपवती स्मृतम् । २३ । क्रोशद्वयंच विस्तीर्णं केवलं पुण्यवर्द्धनम् । तत्रैव स्थापितं लिंगमृषिभिः सप्तभिर्द्विज।२४। सप्तकोटीश्वरं नाम भक्तानां पालको हरः । धातुभिः कल्पितं लिंगं रमणीयं सुनिश्चितम् । २५ । स्कंदपुराणान्तर्गत सह्याद्रिखण्ड, उत्तरार्ध, गोमांचलक्षेत्रमाहात्म्य, अ. ३, p. 310. गोकर्णाचे उत्तरेक नारव्यां सप्तकोटीश्वर :- तस्मादुत्तरतस्तिष्ठेद्दशयोजनमात्रतः नारवेति च विख्याते सप्तकोटीश्वराह्वयम् । ५३ । सह्याद्रिखण्ड, उत्तरार्ध, पृथ्वीदानप्रशंसा, अ. ६, p. 327.

१४ Ind. Ant., vol. 3, pp. 194-195.

१५ रामक्षेत्रे पवित्राणां क्षेत्राणां दशकंत्विदम् । ८६ । तन्मध्ये षष्ठकं श्रेष्ठं तेषां नामानि मे शृणु । गोकर्ण सप्तकोटीशं कुणकेशंच संगमं।८७। हरिहरं त्र्यंबकेशं पवित्रं षष्ठकंत्विदम् । JBBRAS., vol. 11, pp. 110-111.

१६ JBBRAS., vol. 9, p. 266.

राजांची सारी शक्ती पणाला लावली व तो मथुरेवर चालून गेला.

श्रीकृष्ण जरासंधाच्या या स्वाऱ्यांनी आता मेटाकुटीस आला होता. मथुरेचे गणराज्य जवळ जवळ उध्वस्त होण्याच्या मार्गावर होते. राज्यातले तारुण्य आणि द्रव्य विनाश पावत होते. प्रजाही त्रस्त झाली होती आणि हे सर्व आपल्यामुळे होत आहे, याची श्रीकृष्णाला खंत वाटत होती. कंसवध केला म्हणून चिडून जाऊन जरासंध मथुरेचा नाश करू पाहत आहे. मथुरेच्या प्रजाजनांवर त्याचा राग नाही, याची श्रीकृष्णाला जाणीव होती. शिवाय जरासंधाच्या या वेळच्या स्वारीला तोंड द्यायला आपली पुरेशी तयारी नाही, याचीही त्याला कल्पना होती. म्हणून त्याने शक्तीचा उपयोग न करता युक्तीचा अवलंब करायचे ठरविले.

युक्तीचा अवलंब करणे दुसऱ्या एका दृष्टीनेही त्याला भाग होते. यावेळी जरासंध हा एकच शत्रू नव्हता. यवनराजा कालयवनानेही मथुरेवर चालून जायचा घाट घातला होता. कालयवनाला जरासंधाची चिथावणी होती. यावेळी जरासंधाने मुत्सद्देगिरी लढविली होती.

कालयवन हा मूळ गार्ग्यमुनीचा गोपकन्येपासून झालेला पुत्र, पण यवनाधिपतीने त्याला दत्तक घेतल्यामुळे यवन झालेला. भारत पादाक्रांत करायची त्याची महत्त्वाकांक्षा होती. त्याला भीती वाटत होती ती फक्त श्रीकृष्णाची. वास्तविक श्रीकृष्ण हा कुणी सम्राट नव्हता, कुठला राजा नव्हता, की युवराजही नव्हता. पण जरासंधासारख्या बलाढ्य राजाचा सतरा वेळा पराभव केल्यामुळे क्षत्रियकुलात त्याचा दरारा वाढला होता. कालयवनही श्रीकृष्णाला वचकून होता. पण तेवढ्यात जरासंधाकडून त्याला साथ मिळाली. एका बाजूला जरासंध व दुसऱ्या बाजूने कालयवन, अशा दोन आघाड्यांवर झुंज देणे श्रीकृष्णाला शक्य होणार नाही असा अंदाज बांधून कालयवनाने युद्धाची तयारी केली.

श्रीकृष्णाच्या दूतांनी ही बातमी आणताच त्याने ओळखले की, आता खुल्या मैदानात सरळ सामना देणे शक्य नाही. दोन आघाड्यांवर एकाच वेळी झुंज देणे म्हणजे पराभवाला आमंत्रण. आता युक्तीशिवाय तरणोपाय नाही. त्याने अशी एक युक्ती योजिली की, जागतिक युद्धांच्या इतिहासात अशा तऱ्हेचा डावपेच लढविणारा श्रीकृष्ण हा पहिला सेनानी होय. त्याने मथुरा शहर खाली करायचे ठरविले. आजसुद्धा बॉंबहल्ल्याच्या भीतीने शहरे खाली करतात तसे. मथुरा खाली करणे म्हणजे फक्त लोकवस्ती हलविणे नव्हे, तर राजधानीच बदलणे. नव्या शहरासाठी त्याने जागा पाहूनच ठेवली होती. मथुरेपासून शेकडो कोस दूर, सौराष्ट्रात पश्चिम सागराच्या किनाऱ्यावर ह्या ठिकाणी मथुरावासीयांना हलविण्याचे सत्र सुरू झाले. या नव्या ठिकाणी द्वारका नगरीची स्थापना झाली.

हा पवित्रा घेण्यापूर्वी श्रीकृष्णाने कालयवनाशी शीतयुद्धाचा एक प्रयोग करून पाहिला होता. त्याने एक कृष्णसर्प पकडून एका सुंदर घटात घातला व तो कालयवनाला भेट म्हणून पाठविला, "माझ्यासारख्या कृष्णसर्पाला डिवचू नकोस. त्याचा परिणाम ठीक होणार नाही," असे कालयवनाला सुचविण्याचा श्रीकृष्णाचा उद्देश होता.

पण कालयवनही कमी नव्हता. त्याच घटात त्याने लाखो चावऱ्या मुंग्या घातल्या व तो श्रीकृष्णाकडे परत पाठविला. "तू कृष्णसर्पासारखा असलास तर माझ्या पाठीशी लाखो सैनिकांचे संख्याबळ आहे. मुंग्या कृष्णसर्पाला देखील वठणीवर आणू शकतात" असा कालयवनाने उलट श्रीकृष्णाकडे पाठविलेल्या त्या भेटींचा अर्थ होता.

श्रीकृष्णाला हा अर्थ उमजला आणि त्याने सैनिकी बळाचा उपयोग न करता बुद्धि-बळाचा वापर करून शत्रूंचा समाचार घ्यायचे ठरविले.

त्याने द्वारकेला जाण्याबद्दल मथुरावासियांना संदेश दिला. पण लोकांबरोबर श्रीकृष्ण स्वतः मात्र द्वारकेला गेला नाही. जरासंध व कालयवन यांचा रोख आपल्यावर आहे हे ओळखून त्याने रथ सिद्ध केला व तो बलरामासह दुसऱ्या रस्त्याने मथुरेबाहेर पडला. लोकांचा प्रवास निर्वेधपणे व्हावा म्हणून शत्रूचे लक्ष मुद्दाम स्वतःकडे ओढवून घेतले.

श्रीकृष्णाची ही युक्ती सफल झाली. श्रीकृष्ण पळून गेल्याचे व मथुरा उजाड झाल्याचे कळताच जरासंध व कालयवन कृष्णाच्या पाठलागावर निघाले. कृष्ण व बलराम मजल-दरमजल करीत दक्षिणपथात करवीर नगरीपर्यंत (आजचे कोल्हापूर) आले. तिथे वेण्णा नदीच्या तीरावर एका वटवृक्षाखाली त्यांना परशुराम दिसला. नुकताच तो शूर्पारकाहून आला होता. श्रीकृष्णाने परशुरामास नमस्कार करून व आपल्या 'पलायनाचा' वृत्तांत सांगून त्याचा सल्ला विचारला. परशुराम हा योद्धा या नात्याने त्याच्या कालात सर्वश्रेष्ठ समजला जात होता. त्याने रामकृष्णांना संदेश दिला की, त्यांनी गोमंत पर्वतावर जाऊन तिथे दुर्गपद्धतीने कालयवनाशी युद्ध करावे. गोमंत

गिरिशिखराची रचनाच अशी आहे की तिथे दुर्गपद्धतीने युद्ध खेळल्यास त्यांचा हमखास जय होईल. इतके सांगूनच परशुरा मथांबला नाही, तिथपर्यंत त्याने बलराम-श्रीकृष्णाला स्वतः नेऊन सोडले. ह्या शिखरावरून एक धबधबा खाली कोसळत होता. नाना प्रकारच्या लतावृक्षांनी, स्थलचरांनी आणि उरगांनी हा डोंगर भरून गेला होता. तिथून पश्चिम समुद्र आणि नद्या-खाड्यांनी परिवेष्टित अशी अनेक बेटे दिसत होती. हा डोंगर म्हणजे गिरसप्पाचा वरचा माथा असावा असे काहींचे म्हणणे असले तरी वरील वर्णन गोव्याच्या पूर्वेकडील कुवेशीच्या डोंगराला चपखलपणे लागू पडते, तसेच धबधबा म्हणजे दूधसागर! हेच अधिक संयुक्तिक असावे असे वाटते. कारण पुढल्या दंतकथेशी ते अधिक जुळते.

राम-कृष्ण गोमंत पर्वतावर येऊन राहिले. तिथे पाठोपाठ जरासंध आपल्या प्रचंड सैन्यानिशी आला. या ठिकाणी श्रीकृष्ण व बलराम यांना देवांनी शस्त्रास्त्रे दिली असा पुराणांचा हवाला आहे. सुदर्शन चक्र आणि कौमोदकी गदा त्याला इथेच मिळाली. कसेही असो, श्रीकृष्ण जरासंधामधले अठरावे युद्ध गोमंतकाच्या पूर्वेकडल्या परिसरात खेळले गेले. आणि जरासंध अठराव्या वेळी पराजित होऊन परत फिरला.

कालयवनाच्या बाबतीत मात्र हरिवंश, पद्मपुराण, विष्णुपुराण, ब्रह्मपुराण, वगैरे पुराणे जी कथा सांगतात ती थोडीशी अद्भुत आहे. पण ती घडली मात्र गोमंतकात. जिथे विजयनगर, विजापूरकर आणि पोर्तुगीज यांच्या गोव्याच्या सुभेदारांच्या राजधान्या होत्या त्या गोवा शहरात.

जरासंधाचा पराभव करून श्रीकृष्ण एका अंधाऱ्या गुहेत जाऊन लपला. या गुहेत राजर्षी मुचकुंद कित्येक वर्षे झोपून राहिला होता. मुचकुंद हा एक पराक्रमी राजा होऊन गेला देवांनी दैत्यांविरुद्ध लढण्यासाठी मुचकुंदाची मदत घेतली होती. दैत्यांचा नाश केल्यामुळे मुचकुंदावर सर्व देवमंडळी प्रसन्न झाली व 'वर माग' म्हणाली. मुचकुंद इतला दमला होता की, त्याने कित्येक युगे झोप यावी आणि जो कोणी आपली झोपमोड करील त्याचे आपल्या पहिल्या दृष्टिक्षेपातच भस्म व्हावे आणि हे झाल्यावर श्रीविष्णूचे दर्शन घडावे, असा वर मागितला व खूष झालेल्या देवांनी त्याला तो देऊनही टाकला.

मुचकुंद झोपलेल्या गुहेत श्रीकृष्ण शिरला आणि आपला शेला त्याच्या अंगावर घालून कोपऱ्यात जाऊन उभा राहिला. श्रीकृष्णाला गुहेत शिरताना कालयवनाने पाहिले होते. तोही त्याच्या पाठोपाठ आत शिरला व झोपलेली व्यक्ती म्हणजेच श्रीकृष्ण असे समजून त्याने मुचकुंदाला लाथ मारली. मुचकुंदाची झोपमोड झाली, त्याने डोळे उघडून कालयवनाला पाहिले, आणि तत्क्षणी कालयवनाची राख होऊन गेली! त्याने मान वळवली आणि श्रीकृष्णाचे त्याला दर्शन झाले.

भस्म होऊन जाण्याचा अतर्क्य प्रकार सोडला तर मुचकुंदाकडून कालयवनाचा नाश झाला आणि तो श्रीकृष्णाने आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर घडवून आणला हे सत्य शिल्लक उरतेच.

ज्या ठिकाणी मुचकुंद झोपला होता ती गुहा आजही जुन्या गोव्यात दाखविली जाते. ब्रह्मपुरी या नावाने हा परिसर आज ओळखला जातो. श्रीकृष्णाच्या पदस्पर्शाने पुनीत झालेला हा प्रदेश कित्येक काळापासून एक पुण्यक्षेत्र बनले आहे.

आता यापुढील कृष्णकथा इतिहास-पुराणे सांगत नसून दंतकथा सांगते. दंतकथा अशीः-

श्रीकृष्ण दक्षिणेला पळून जात आहे ही बातमी मथुरावासियांना कळली तशी ती देवकीलाही कळली. या घटनेत युद्धाचा काही डावपेच असेल याची बिचारीला कल्पनाही आली नाही. तिला वाटले, श्रीकृष्णाच्या जीवाला धोका निर्माण झाला असावा. तिच्या मातृहृदयाने ठाव सोडला.

कृष्णाला लहानाचा मोठा केला यशोदेने. तिनेच त्याच्या खस्ता खाल्ल्या आणि बाललीलाही पाहिल्या. दहीदुधाची चोरी केलेली पाहिली आणि गोपींच्या कागाळयाही ऐकल्या. कालियामर्दनाच्या वेळी तिच्या हृदयाला कापरे भरले होते आणि गोपूजेच्या निमित्ताने इंद्राने जलप्रलय मांडला, तेव्हा श्रीकृष्णाच्या जिवाच्या भयाने ती गांगरून गेली होती. हे सारे खरे असले तरी श्रीकृष्णाला जन्म दिला होता तो देवकीने. यशोदाही त्याची माता होती, पण गर्भवासाचे दिव्य केले होते ते देवकीने. कंसाच्या भयाने नऊ महिने व्याकुळ झाली होती ती देवकी. श्रीकृष्णाचे चढते-वाढते सामर्थ्य आणि कीर्ती ऐकून ती सुखावत होती, पण त्याचा सहवास मिळत नाही म्हणून मनातल्या मनात कुढत होती. कंसवधाच्या वेळी श्रीकृष्ण देवकीला उघडपणे भेटला होता आणि तिचे मातृत्व त्याने जाहीर केले होते. लोकांना कळले होते की, श्रीकृष्णाची खरी माता यशोदा नसून देवकी आहे.

पण त्यानंतरही श्रीकृष्णाचा सहवास तिला लाभला नव्हता. जरासंधाशी चाललेल्या युद्धमालिकेमुळे, श्रीकृष्णाला उसंत मिळत नव्हती, आणि मनात इच्छा

असूनही देवकीच्या सहवासात राहणे त्याला जमत नव्हते. देवकीच्या मनाची तडफड चालली होती. पुत्रसुखाला ती दुरावली होती.

मनाच्या अशा अवस्थेत असतानाच कृष्ण दक्षिणेला पळून जात असून त्याचा पाठलाग कालयवन व जरासंध करीत आहेत, ही वार्ता तिच्या कानावर आली. ती सैरभैर झाली. तिची विचारशक्तीच नाहीशी झाली. मेंदूला बधिरता आली. इतरांबरोबर द्वारकेच्या रस्त्याला लागलेली देवकी पुढे न जाता एकदम दक्षिणेच्या दिशेने चालू लागली.

करवीर नगरीत तिला कळले की, राम-कृष्णांचा रथ आणखी पुढे गेला आहे. तिने पुढचा रस्ता धरला.

गोमंत पर्वताच्या पायथ्याशी पोचताच ती घाबरून गेली. तिथे नुकतेच एक महायुद्ध लढले गेले होते. साऱ्या परिसरात रक्तामांसाचा चिखल झाला होता. झाडे-पेडे कोळपून गेली होती. सर्वत्र कोल्हे-कुत्रे आणि गिधाडे दिसत होती.

असे भयानक दृश्य पाहण्याची तिच्या डोळयांना सवय नव्हती. ती गांगरून गेली. या भयानक लढाईत एकाकी कृष्णाचे काय झाले असेल याची तिला कल्पनाच करवेना. तिचे मातृहृदय गलबलून गेले. कृष्णाच्या नावाने ती आक्रोश करू लागली. कृष्ण या संकटातून निभावला असेल असे तिचे अंतर्मन तिला ग्वाही देऊ लागले. पण तो आता कुठे असेल? कुठल्या वाटेने गेला असेल? त्याला कडकडून भेटल्याशिवाय तिच्या मनाचे समाधान होणार नव्हते.

आणि मग अकस्मात तो चमत्कार घडला! तिला पान्हा फुटला. स्तनांतून दुधाची धार लागली. ती तिला आवरेना. दूध इतके सांडू लागले, इतके वाहू लागले, की दुधाचा प्रवाह जमिनीवरून जाऊ लागला. शुभ्र दुधाची नदी पश्चिमेकडे वळली. गोमंत पर्वताच्या शिखरावरून दुधाच्या त्या प्रवाहाने खाली उडी घेतली. दंतकथा सांगते की, हाच दूधसागर! दुधाचा हा प्रवाह मग सपाटीच्या प्रदेशातून पुढे वाहू लागला.

ज्या दऱ्याखोऱ्यांतून दुग्धप्रवाहाने वाट काढली होती, त्याच वाटेने देवकी चालू लागली. तिला माहीत होते की ही दुग्धधारा श्रीकृष्णासाठी निर्माण झाली आणि तो जेथे कुठे आहे तिथपर्यंत ती जाणार आहे!

इकडे श्रीकृष्ण मुचकुंदाच्या गुहेतून नुकताच बाहेर पडत होता. मुचकुंदाच्या हातून कालयवनाचा नाश झाला होता. त्याचे ईप्सित साध्य झाले होते.

त्याने त्या खळखळत येणाऱ्या दुग्धप्रवाहाचा आवाज ऐकला, तो शुभ्र स्त्रोत पाहिला, आणि काय घडले हे अंतर्ज्ञानाने जाणले. मातेच्या भेटीसाठी तो झपाट्याने चालू लागला.

चुडामणी बेटात त्याने देवकीला पाहिले. क्षणार्धात त्याने बालरूप धारण केले. एका वटवृक्षाखाली तो रांगू लागला, खेळू लागला.

देवकीची दृष्टी त्याच्याकडे गेली आणि स्तनांप्रमाणेच तिच्या डोळयांतून अश्रुधारा वाहू लागल्या. श्रीकृष्ण हात पसरून पुढे झेपावला आणि आईच्या गळयाला त्याने मिठी घातली. मातेच्या स्तनांतून ओघळणारे दूध तो अधाशाप्रमाणे पिऊ लागला! देवकीची गात्रानुगात्रे पुलकित होऊन उठली. तिच्या आनंदाला सीमा नव्हती! सुखाला अंत नव्हता. बाळकृष्णाला मिठीत घेऊन विश्वाच्या अंतापर्यंत तिथेच थांबायची तिची तयारी होती.

आणि तशीच ती थांबलीही. मथुरेच्या बंदिशाळेत जन्माला आलेला, गोकुळातल्या नंदगृहात वाढलेला आणि यमुनेच्या जलाशयात खेळलेला बालकृष्ण देवकीमातेच्या कडेवर बसून तिला मातृसुख देण्यासाठी आणि भक्तजनांचे प्रिय करण्यासाठी गोव्यातल्या एका गावी आज तिष्ठत आहे! विश्वाच्या अंतापर्यंत असाच तिष्ठत राहणार आहे!

## श्री देवकीकृष्ण संस्थान

फोंडा तालुका हे गोव्याचे हृदय. मारुतीच्या हृदयात जसा राम व्यापून राहिला होता, तसा हा फोंडा महाल देवदेवतांनी व्यापलेला आहे. अनेकानेक देव इथे वस्तीला आले आहेत. प्रत्येक गावात देवमंदिरे आहेत. यांपेकी सर्वाधिक देवमंदिरे असलेला गाव हा माशेल. या गावात चार-पांच शांतादुर्गाच आहेत, एक विठोबा आहे, दुर्गा आणि दत्त आहे आणि यदुकुलश्रेष्ठ श्रीकृष्ण आपल्या सात-आठ जणांच्या परिवारासह राहायला आला आहे.

राहायला आला आहे असे मी म्हणतो याचे कारण हे की, वरगावची ग्रामदेवी आणि जुन्या बाजारातला विठोबा सोडला तर इतर सर्वच दहा वीस देवता माशेलात फक्त दोनेकशे वर्षांपूर्वी आल्या. या सर्व देवतांपैकी आपल्याला आज माहिती करून घ्यायची आहे ती श्री देवकीकृष्ण आणि त्याच्या परिवार दैवतांची.

### माशेलमधील श्री देवकीकृष्ण व इतर परिवारदैवते

माशेलमधील सर्व देवालयांत श्री देवकीकृष्णाचे देवालय सर्वात मोठे असून ते रस्त्यापासून काहीशा उंचावर आहे. काही पायऱ्या चढून देवस्थानच्या प्राकारात जावे

लागते. देवालयाची इमारत फोंडा महालातील किंवा माशेलातीलच इतर देवस्थानांइतकी जुनी नाही. ती सुमारे दीडशे वर्षांची असावी. या देवस्थानच्या उजव्या हातास चोडणच्या भूमिकेचे छोटेसे मंदिर आहे. आणखी उजव्या हातास थोड्या अंतरावर, पण मागच्या भागात रवळनाथ- ज्याला पिसो खळू या नावाने संबोधिले जाते- मंदिर आहे, तर डाव्या हातास लक्ष्मी-रवळनाथाचे देवालय आहे. समोरच्या विस्तीर्ण मैदानाच्या पलीकडे लहानशा देवळीवजा इमारतीत कात्यायनी, चोडणेश्वर, महादेव व दाडशंकर किंवा दाडसांकळ यांची वसतिस्थाने आहेत, आणि बऱ्याच अंतरावर मल्लिनाथाचे मंदिर आहे. हा सर्व परिवार मिळून श्री देवकीकृष्ण संस्थान होते.

फोंडा महालात इतर काही गावांतून भव्य व वैभवसंपन्न अशी मंदिरे आहेत. तसे व तितके श्रीमंत असे देवकीकृष्ण संस्थान नाही; पण या मंदिराचे एक खास वैशिष्ट्य हे आहे की, देवकीकृष्ण देवस्थानासमोर जसे भव्य असे मैदान आहे तसे इतर कुठेही नाही. याच मैदानात पौष शुद्ध द्वितियेची छोटी व पौष पौर्णिमेची माल्लीपुनव ही मोठी जत्रा भरते. त्यावेळी हा सारा परिसर तर विविध प्रकारच्या दुकानांनी फुलून जातोच, पण शिवाय या प्रचंड प्राकारांत लोक न मावल्यामुळे उंचावरील रस्ताही माणसांनी भरून जातो. पौर्णिमेच्या रात्रीचा रथोत्सव हे या जत्रेचे मोठे वैशिष्ट्य. या वैशिष्ट्याबरोबरच आणखी एक वैशिष्ट्य सांगायचे तर इतर सर्व देवस्थानांत देवालयासमोर तलाव असतो, तसा इथे कुठल्याही देवस्थानासमोर तलाव नाही!

## मूळ चोडणची दैवते

ही सर्व दैवते चोडणकारांची दैवते आहेत. चोडणकारांची दैवते म्हणजे मूळ चोडण गावातली. सुमारे साडेचार हजार वर्षांपूर्वी परशुरामाने गोवा प्रदेश वसविला. त्याने २१ वेळा निःक्षत्रिय पृथ्वी करून मिळविलेल्या राज्याचे दान आपल्या गुरूला दिले व तो गोमंतकात आला व त्याने ब्रह्मावर्ताहून दशगोत्री ब्राह्मण आणून यज्ञ केला, असे सह्याद्रि खंडात सांगितले आहे. या ब्राह्मणांनी आपल्याबरोबर जे कुलदेव आणले त्यांत देवकीकृष्ण होता.

या देवकीकृष्णाची स्थापना चूडामणी म्हणजे चोडण गावात करून पंचगोत्रांचे काही ब्राह्मण तिथे राहू लागले. कोकणाख्यान सांगते-

आतां भतग्रामींचे तिनी ग्राम । त्यामाजी चूडामणी प्रथम ।

क्षेत्रस्थान महिमा उत्तम । ब्राह्मण समुदाय उदंड ॥

काश्यपदि पंच गोत्री । ब्राह्मण वसती त्या क्षेत्रीं । जमदग्नी भारद्वाज अत्रि । कौशिक कौंडिण्य आणिकही॥

क्षेत्र थोर देवस्थानें बहुत । त्यामाजी चारी मुख्य आहेत ।

मही मोठी ऊर्जा बहुत । महोत्साह होत सर्वदा ॥

एक देवकीकृष्ण विख्याती । दुसरी महामाया भगवती ।

रवळनाथ दोन्ही स्थानें असती । गावणवाडा आणि पाणदीसी ॥

## बाटवाबाटवीच्या काळातील धर्मच्छळ

इ. स. १५९५ मध्ये फ्रांसीस्कु पाईश नावाच्या एका पोर्तुगीज अधिकाऱ्याने Tombo da Ilha da Goa e das Terras de Salcete e Bardes नावाचा एक ग्रंथ लिहिला आहे. त्यात १५४० च्या सुमारास चोडणमधील मोडलेल्या सर्व देवस्थानांची यादी दिली आहे, त्यांत पुढील देवालयांचा नामनिर्देश आहेः गणेश, रवळनाथ, भावकादेवी, मल्लनाथ, भगवती, देवकी, संतपुरुष, बाराजण, नारायण, कांतेश्वर, चंडेश्वर व धाडसांकळ.

इ. स. १५१० मध्ये आफौंसु द आल्बुकॅर्कि याने गोवा बेट विजापुरकर आदिलशाहीकडून काबीज केले व लवकरच दिवाडी, चोडण व जुवे ही बेटेही घेतली. प्रथम त्यांनी राज्यकर्त्या मुसलमानांना कापून काढले व हिंदू जनतेला अभय दिले. पण वीस वर्षांनंतर मात्र त्यांनी हिंदूंना बाटवण्यास सुरवात केली आणि तीस वर्षांनंतर त्यांची या बेटांतली सर्व देवळे पाडून टाकली; तिथे चर्चे उभारली व देवळांच्या जमिनी जप्त करून या चर्चांच्या खर्चासाठी लावून दिल्या. १५४१ पूर्वीच ही सर्व देवालये मोडून टाकल्याची नोंद इतिहासात सांपडते.

## देवतांची स्थलांतरे

देवालये मोडली, चोडणचे अनेक जातींचे अनेक गावकरी बाटले; पण जे बाटायला तयार नव्हते, ते स्वधर्माच्या रक्षणासाठी आपापले गाव सोडून देशांतराला गेले. पण जाण्यापूर्वी ते आपापले देव घेऊन गेले. देव घेऊन गेले म्हणजे सर्वच ठिकाणी देवाच्या पाषाणी मूर्ती त्यांनी नेल्या नाहीत, पण नारळाच्या वा जलकलशाच्या रूपाने देवाची 'सासाय' घेऊन गेले. कांही दक्षिणेला कॅनरा जिल्हा, कोचीन इथपर्यंत गेले; तर उत्तरेला राजापूरपर्यंत गेले. या सर्व ठिकाणी त्यावेळी हिंदू राज्ये होती. तिथल्या राजांनी या गोवेकरांना व त्यांच्या देवतांना आसरा दिला. पोर्तुगीजांनी केलेल्या बाटवाबाटवीच्या काळात जो एक लोंढाच दक्षिण दिशेला गेला, त्यात चोडणेचेही रहिवासी

होते. आज उत्तर कानडा जिल्ह्यातील कागल गावात देवकीकृष्णाचे एक मोठे देवालय उभे आहे. मल्लनाथाची एक मूर्तीही त्यात आहे. वर्षभर अनेक उत्सव तिथे होतात. रथोत्सव होतो. त्याचे कारण कुणा चोडणकर कुटुंबांनी आपल्या कुलदेवाची 'सासाय' तिथे नेली होती हेच होय. दक्षिण कानडा जिल्ह्यात हिरेगुट्टी व कारकल या गावात लक्ष्मी-रवळनाथाचीं मंदिरे आहेत. सुपीर या नाईक कुटुंबाकडे देवकीकृष्णाचे एक छत्र आहे, तर मंगळूरच्या कृष्णभट्ट यांच्या घरी देवाचे कवच आहे असे सांगतात.

## मयेच्या वाडे-वाड्यात स्थलांतर

पण चोडणकर मंडळी जेवढी दूरदेशीं गेली, त्याहून अधिक मांडवी नदीचे फाटे ओलांडून जवळच्या बारदेस भतग्राम तालुक्यात गेली. हा तालुका त्यावेळी विजापूरच्या आदिलशाही या मुसलमान सत्तेखाली होता. पण स्थानिक अधिकारी मात्र हिंदू होते. आदिलशाही कारकीर्दीत हिंदूंचा छळही झाला नाही, उलट हिंदू अधिकाऱ्यांकडून गोवा, चोडण वगैरे बेटांतून विजापुरी मुलखात गेलेल्या हिंदूंना व त्यांच्या देवतांना संरक्षण मिळाले. चोडणचे बहुतेक देव मये गावाजवळील वाडे या छोट्या गावात नेण्यात आले व चोडणकर मंडळींनी तिथे आपले संसार थाटले. हळदोणे व चिंबल इथल्या ग्रामदेवीही तिथे गेल्या. म्हणूनच आजही चोडणकर, हळदणकर व चिंबलकर आडनाव लावणारी कुटुंबे तिथे अस्तित्वात आहेत.

मये येथे सुमारे सव्वादोनशे वर्षे देवकीकृष्ण सपरिवार राहिला असावा व त्यानंतर १७८० च्या सुमारास भतग्राम महाल पोर्तुगीजांच्या ताब्यांत गेल्यावर माशेल गावीं त्यावे स्थलांतर झाले असावे. वाडे गावात आम्ही वृद्ध माणसांकडे चौकशी केली तेव्हा या अंदाजाला पुष्टी मिळाली.

## देवकीकृष्ण गोव्यात कसे?

वर परशुरामाने यज्ञकार्यार्थ आणलेल्या ब्राह्मणांनी आपली कुलदैवते आणली त्यात देवकीकृष्ण होता असे म्हटले आहे. परंतु देवकीकृष्ण असे देवतेचे जोडनाव भारतात कुठेही प्रचलित नाही. जी जोडनावे दिसतात ती यशोदाकृष्ण, राधाकृष्ण अशी. देवकीने श्रीकृष्णाला जन्म दिला तरी तिचा सहवास त्याला फारसा लाभला नाही. मग देवकी-कृष्णाचे मंदिर चोडणला कसे? या प्रश्नाचे उत्तर वर वर्णिल्याप्रमाणें हरिवंशांतील एका कथेत सापडते. श्रीकृष्ण-जरासंधाचे १८ वे युद्ध गोमंत पर्वताच्या पायथ्याशी झाले. जरासंधाच्या मदतीला कालयवन होता. या युद्धात श्रीकृष्णाला जय मिळेल की नाही या भयाने श्रीकृष्णापाठोपाठ देवकी दक्षिणेला आली पण श्रीकृष्णाने युद्धाने जरासंधाचा पाडाव केला व बुद्धिबळाने मुचकुंदाच्या हातून कालयवनाचा नाश केला. आणि मग श्रीकृष्ण परत जात असताना चोडणबरोबर देवकी-श्रीकृष्णाची गाठ पडली.

## मूलस्थान चोडणमधील मंदिरे

प्रथमच सांगितले पाहिजे की, चोडण गावची आपली सर्व मूलस्थाने पोर्तुगीजांनी संपूर्ण उध्वस्त करून टाकली. आज एखाद दुसऱ्या अवशेषाशिवाय तिथे काहीही नाही. जुन्या देवालयांचे चिरे सुद्धा नाहीसे झाले आहेत. देवस्थानांचे चवुतरेच नव्हे, तर पायाच्याही खाणाखुणा नाहीत. फक्त परंपरेने चालत आलेल्या सहा वाड्यांची नावे तेवढी प्रचारात आहेत. देवालये अमुक ठिकाणी होती व तलाव तमुक ठिकाणी होते एवढेच आज दाखविले जाते. परंतु देण्यात येत असलेली माहिती मात्र चुकीची नाही हे निःसंशय.

## मलनाथवाडा व गावणवाडा

पणजीहून चोडणला रायबंदरच्या तारीवरून पश्चिमेच्या दिशेने जिथे चोडण बेटाचा चिंचोळा भाग आहे तिथे आपण प्रवेश करतो. तिथून सरळ रस्ता जातो तो माडेल वाड्यावर. माडेल हा त्या काळचा मलनाथवाडा. इथे ज्या ठिकाणी मलनाथाचे देऊळ होते, तिथे एक दगड ठेवून स्मारक उभे करण्यात आले आहे. ही जागा माडेलवरील हिंदू नागरिकांनी खरेदी केली असून, तिथे एक मंदिरही उभारले आहे. देवालयावर तळीची जागा दाखविली जाते.

इथून पुढे पूर्वेकडे जाताना आवणेवाडा लागतो या वाड्यावर रस्त्याच्या डाव्या हाताला कात्यायनी, चोडणेश्वर, महादेव, लक्ष्मीनारायण यांची मंदिरे होती. जरा पुढे गेल्यावर गावणवाडा भेटतो. रस्त्याच्या उजव्या बाजूला उतरंड असलेले एक शेत आहे आजच्या या शेतीच्या जागेत पूर्वी श्रीलक्ष्मी रवळनाथाचे देवालय होते. शेतात खणले तर भिंतींचे चिरे सापडतात. इथे शेतात देवालयाची एकुलती एक खूण उपलब्ध आहे, ती एका पडक्या खांबाची. चिऱ्यांनी बांधलेल्या या स्तंभाचा फार थोडा भाग आता शिल्लक आहे. जवळच एक विहीर आहे. सुमारे पंधरा वर्षापूर्वी ग्रिटली मिट्टलवॉल्नर नावाची एक संशोधक जर्मन विदुषी मंदिर व चर्च शिल्पाचा अभ्यास करण्याकरिता गोव्यात आली होती. तिने या विहिरीत शोध घेतला तेव्हा तिला एक वीरगळ सापडला. हा वीरगळ वर काढून जवळच रस्त्यावरच्या औदुंबराच्या कट्ट्यावर तो ठेवण्यात आला आहे. हा वीरगळासारखा

दिसणारा पाषाणखंड म्हणजे देवळाचा पाषाणी अवशेष असावा अशी गावकऱ्यांची समजूत आहे. परंतु तो देवालयाचा अवशेष नाही हे निश्चित; कारण त्याचा आकार तर वीरगळाचा आहेच; पण वीरगळ जमिनीत पुरण्यासाठी पाषणखंडाला जसा खडबडीत आकार असतो, तसाच या पाषाणाच्या तुकड्यालाही आहे.त्याचा आकारही वीरगळाच्या आकाराएवढाच आहे. वीरगळावर तीन पट्ट्यांत कोरीव काम केलेले असते, तसेच यावरही केलेले आहे. ज्या युद्धात वीर मेलेला असतो, त्या युद्धाचे कोरीव काम केलेले असते परंतु या वीरगळात योद्धे वा युद्धप्रसंग कोरलेला नसून, वाद्ये वाजवणाऱ्या वादकांची चित्रे कोरलेली आहेत. कदाचित हीं रणवाद्ये असावीत. अगदी वरच्या पट्टीत वीरयोद्धा स्वर्गात अप्सरांच्या सान्निध्यात असलेला दाखविला जातो. परंतु या 'वीरगळा'ची वरची पट्टी भग्न झालेली आहे. त्यामुळे तिथे काय कोरलेले होते ते कळत नाही.

गावणवाड्यावरील रहिवाशांनी इथे जवळच एक नवे देवालय अगदी अलीकडेच उभारले असून, आज तिथे एक सुंदर लाकडी विष्णुमूर्ती बसवली आहे. लवकरच पाषाणी मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करण्यात येणार आहे.

### उध्वस्त पांडवाडा

त्यानंतर बऱ्याच अंतरावर पांडवाडा आहे या पांडवाड्याला अलीकडे कुणी पांडववाडा म्हणतात. परंतु मूळचा शब्द कोकणाख्यानात सांगितल्याप्रमाणे पाणदीवाडा असाच असला पाहिजे. पाणद व पाणदी या शब्दाचा अर्थ गावातून किंवा शेतातून दोन कुंपणांमधून जाणारी अरुंद वाट असा आहे. हे वर्णन आजही तिथून जाणाऱ्या रस्त्याला लागू पडते. यावरून पाणद असलेला वाडा आणि अपभ्रंशाने पांडवाडा असे या वाड्याचे नाव पडले असावे. गावण हा शब्द गावणे या शब्दावरून असावा. गावणे नावाची गोव्यात गावे आहेत. चोडणमध्ये गावणे नावाचा वाडा असावा. हा शब्द कानडी असणे शक्य आहे.

चोडणच्या पांडवाड्यावर फक्त तळीची व देवळाची जागा तेवढी दाखविली जाते. तळी होती तिथे आज शेत आहे आणि देवळाच्या जागी फक्त काही झाडे आहेत.

### श्री देवकीकृष्ण मंदिर

आता मुख्य दैवत देवकीकृष्णाचे मंदिर गावणवाड्याच्या जवळ दिवाडीच्या बाजूला म्हणजे दक्षिणेला होते. इथेही देवळाच्या खुणा आज नष्ट झाल्या आहेत. पण देवस्थानची व तळीची जागा दाखवली जाते. तळी आता बुजून गेली आहे. इथे चोडणकरांचे देवकीकृष्ण हे प्रमुख दैवत होते यात शंका नाही. कारण इथे शिमग्याच्या वा इतर उत्सवांत प्रथम देवाचा बहुमान केला जातो आणि मग सर्व गावकरी पांडवाड्यावरील 'मांडा' वर जातात आणि इथून खेळे बाहेर पडून प्रथम माडेलातील मलनाथाच्या जागेत व मग इतरत्र जातात.

पोर्तुगीजांनी काही काळानंतर धर्मच्छळाचे धोरण कमी करून गाव सोडून गेलेल्या गावकऱ्यांना परत बोलावले तेव्हा, बरेच चोडणकर चोडणला परत आले व शेती करू लागले. आज मूळचे चोडणकर इथे आहेत तसेच इतर ठिकाणांहून आलेले लोकही स्थायिक झाले आहेत. या सर्व जातींच्या हिंदूंची आणि बाटवलेल्या ख्रिस्त्यांचीही श्रीदेवकीकृष्णावर भक्ती आहे. हिंदु आणि ख्रिश्चनही प्रसादपाकळीसाठी माशेलात जातात, नवस करतात आणि ते फेडतातही. चोडणच्या सहाही वाड्यांवरील हिंदू जनता माशेलात जाऊन श्रावण शुद्ध १३ शीला देवकीकृष्ण व भूमिकेला रंगपूजा बांधतात. चोडणला या भूमिकेचे देवालय श्री देवकीकृष्ण मंदिराजवळच होते. दाडसांकळ देवालय मात्र या सर्व परिसरापासून बरेच दूर होते. तिथे आजही तळी आहे.

### वाडे गावातील देवस्थाने

चोडण गावातून ह्या सर्व देवदेवता मयेजवळील वाडे गावात नेण्यात आल्या हे वर सांगितले. इथेही या सर्व देवतांची मंदिरे जवळ जवळ बांधण्यात आली. अगदी भर रस्त्याला लागूनच या मंदिरांचे अवशेष स्पष्ट दिसतात. बहुतेक सर्व देवालयांचे चिरे परवापर्यंत पडलेले होते. पण नंतर ते लोकांनी स्वतःच्या बांधकामासाठी उचलून नेले. या ठिकाणी काही वर्षांपर्यंत रान माजलेले होते. अजूनही रान आहे, काटेरी जाळ्या आहेत. पण पायवाटेने हिंडू लागलो म्हणजे प्रत्येक देवस्थानच्या भिंतीच्या पायाचे दगड अधूनमधून भेटतातच. त्यावरून देवालयांच्या भव्यतेची कल्पना करता येते. प्रथमच रस्त्याला लागून पांडवाड्याच्या सीमेची सुरुवात होते. या जागेवर एक छोटी घुमटी स्थानिक जनतेच्या भावना लक्षात घेऊन चौगुले कं. ने बांधलेली आहे. कारण या स्थानाला लागूनच त्यांच्या प्रंचड खाणी आहेत.

पांडवाड्याच्या या सीमेपासून थोड्या अंतरावर रवळनाथाचे मंदिर होते. त्याचा फक्त पायाच शिल्लक असला तरी देवालयासमोरचा स्तंभ मात्र संपूर्ण उभा आहे, अशामुळे की एका वृक्षाच्या पाळाखोडाने तो अशा प्रकारे व्यापून टाकला आहे की त्याचा एक चिराही निखळणे गेल्या दोनशे वर्षांत शक्य झाले नाही. अशाच प्रकारचा

एक स्तंभ माशेलातील पांडवाडा रवळनाथ देवालयाच्या डाव्या अंगाला बांधण्यात आलेला आहे. परंतु तो अजून उजवलेला नाही. आणि म्हणून जत्रेच्या वेळी त्यावर दीपरले लावत नाहीत. मये येथे गेल्यावर तिथल्या वृद्ध रहिवाशांकडून कळले की, मयेचा स्तंभ संपूर्ण मोडून गेल्याशिवाय माशेलातील स्तंभ उजवला जाणार नाही! आणि मयेचा स्तंभ तर वृक्षाच्या आधारामुळे पूर्ण शाबूत आहे!

आणखी थोडे अंतर गेल्यावर श्रीदेवकीकृष्ण व भूमिका तसेच इतर देवालयांचे पाये दिसतात. परंतु अमुक देवस्थान अमुक ठिकाणी होते हे मात्र निश्चितपणे ओळखता येत नाही. फक्त गावणवाडा रवळनाथाचे स्थळ मात्र मयेच्या वाडे गावच्या गावकऱ्यांना माहीत आहे. देवालयाजवळ देवाची जी विहीर होती त्या विहिरीजवळ एक प्रचंड वृक्ष उभा आहे; तिथून काही अंतरावर गावणवाडा लक्ष्मी-रवळनाथाची तळी मात्र पूर्णपणे मोकळी आहे. पायऱ्या उध्वस्त झाल्या असल्या तरी बांधकामाची कल्पना येते. तळीत आजही पाणी आहे.

## माशेलमध्ये स्थलांतर

नेमक्या कोणत्या वर्षी चोडणकरांच्या या देवता वाडे गावातून माशेलात हलविण्यात आल्या हें सांगता येत नाही. सुमारे दोनशे वर्षांपूर्वी पेडणे, सत्तरी व भतग्राम हे तीन महाल सावंतवाडकरांकडून पोर्तुगीजांच्या अंमलाखाली आले. त्यानंतर ही घटना घडली असावी. पण ती का घडली? या काळात पोर्तुगीजांनी धर्मच्छळ केल्याची इतिहासांत नोंद नाही. कदाचित मये ग्रामपंचायत मोडून टाकून तो गाव कौंदि द मयें या पोर्तुगीज सरदाराला देण्यात आल्यावर तिथल्या हिंदू जनतेला त्याने त्रास द्यायला सुरवात केली असावी, म्हणून हीं देवालये तिथून उठलीं असतील काय? वाडे गावचे गावकरी म्हणतात की फिरंग्यांच्या त्रासामुळे तीं तिथून माशेलांत नेलीं.

वाडे गावात देवकीकृष्णाच्या जमिनी होत्या. अगदी अलीकडेपर्यंत या जमिनीतील वृक्षांच्या फळांची पहिली भेट देवकीकृष्णाला माशेल येथे पोचवण्याची प्रथा होती.

माशेलमध्ये या देवता आल्या आणि दोन्ही रवळनाथ, मलनाथ, दाडसांकळ, वगैरे दैवतांची छोटी-मोठी देवालये त्यांच्या त्यांच्या महाजनांनी लगेच बांधलीं असावींत असे त्या देवालयांच्या वास्तुपद्धतीवरून दिसतें. वास्तुशिल्पाची ही पद्धती दक्षिण कोंकण, गोवा आणि कारवार या भागांत समान आहे. त्या मानाने श्रीदेवकीकृष्णाचे मंदिर बऱ्याच उशीरा बांधण्यात आले. मयेच्या वाडे गावाहून आणलेली देवकीकृष्णाची मूर्ती चौकी या नावाने ओळखल्या जाणाऱ्या इमारतीत काही काळ ठेवण्यात आली आणि त्यानंतर काही काळाने आजचे देवकीकृष्णाचे मंदिर उभारण्यांत आलें. मंदिर बांधल्याचा शिलालेख उपलब्ध आहे; परंतु त्यावरील अक्षरे अस्पष्ट झालीं आहेत. तरीसुद्धा शके १७४९ हे साल वाचण्यात आले आहे. म्हणजे इ. स. १८२७ साली आजचे मंदिर उभारण्यात आले असले पाहिजे. चौकीवर देवकीकृष्णाची पूजामूर्ती होती याचा पुरावा म्हणजे आवळी भोजनाच्या निमित्ताने श्रीदेवकीकृष्णाची पालखी आज 'चौकी' वर जाते आणि तिथे नैवेद्य ग्रहण केल्यावर मग संतर्पण होते हा होय. आज देवालयात असलेली पूजामूर्ती ही मूळ वाडे गावातून आणली असावी असा अंदाज आहे. कारण ती खूप जीर्ण झाली आहे. दीडशे वर्षांहूनही ती अधिक जुनी असली पाहिजे.

## उत्सव व मूर्ती

गोव्यातील इतर देवस्थानांप्रमाणेच माशेलांतील चोडणकरांच्या सर्व देवस्थानांतून जत्रोत्सव होतात. परंतु देवकीकृष्ण मंदिरात मात्र उत्सवांची संख्या अधिक असते. त्यातला धार्मिक दृष्ट्या महत्त्वाचा भाग हा जत्रेचा. देवकीकृष्णाची जत्रा मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीला होते. चातुर्मास वगळता वर्षभर पाक्षिक शिबिकोत्सव होतो, तोही दर त्रयोदशीलाच. या दृष्टीने या संस्थानात त्रयोदशीला महत्त्व आहे. पण त्रयोदशीलाच महत्त्व का? या तिथीला वाड्याहून देवकीकृष्ण माशेलात आला का? की फार प्राचीन काळी त्रयोदशीला देवकीकृष्णाची चोडण येथे स्थापना झाली?

देवकीकृष्ण व त्याच्या परिवार दैवतांना पोर्तुगीजपूर्व काळात सर्व चोडणकर भजत असत. त्यात सर्व जातींचे लोक होते. सेवेकरी सर्व जातींचे होते आजही सारस्वतांप्रमाणेच इतर जातींचे लोकही अत्यंत श्रद्धेने आपला कुलदेव म्हणून या दैवताकडे पाहतात. जत्रांत भाग घेतात. त्यांच्या स्त्रिया जत्रांतून सारी रात्र दिवणे तेवत ठेवतात. विशेषतः माल्नीपुनव (पौष शुद्ध पौर्णिमा) आणि बियेच्या जत्रेत (पौष शुद्ध द्वितिया).

या जत्रांशिवाय नवरात्र हा देवकीकृष्ण मंदिरांतला मोठा उत्सव. नऊही रात्री एखाद्या प्रसिद्ध कीर्तनकाराचे कीर्तन व मखरोत्सव हीं या उत्सवाचीं वैशिष्ट्यें. कार्तिक शुद्ध प्रतिपदेचा उत्सवही मोठ्या थाटात होतो. हा उत्सव देवाच्या सेवेकऱ्यांकडून होतो. रथ नाचविणे व दारूकाम या उत्सवात मोठ्या प्रमाणात होते. याशिवाय रामनवमी,

कृष्णजन्माष्टमी, लक्ष्मीपूजन, कोजागिरी, शिमगा, काला इ. सर्व उत्सव वर्षभर चालू असतातच. यातील दहिकाला व गवळणकाला हे खास श्रीकृष्णाशी निगडित असलेले उत्सव. भारतातील इतर सर्व देवालयांत श्रीकृष्णाचीं उत्तरायुष्यांतलीं रुपें दिसतात. फक्त उडुपी येथील श्रीकृष्णमंदिरांत व माशेलमधील देवकीकृष्ण देवालयातच बालकृष्ण आहे. उडुपीला हातात रवी घेतलेला, तर माशेलात देवकीमातेच्या कडेवर बसलेला. देवकी व श्रीकृष्ण यांच्या फणामूर्ती तर सुंदर आहेतच, पण त्यांच्या उत्सवमूर्तीही सुरेख आहेत. पालखीत बसताना श्रीकृष्ण मातेच्या कडेवर बसतो, तर रथात तो एकट्याच चढतो. रथातील श्रीकृष्णाची तुलसीकाष्ठाची श्यामवर्णी मूर्ती तर इतकी गोजिरवाणी आहे की कुणाही नास्तिकाला देखील या बालकृष्णाचा मोह पडावा! या बालकृष्णाचा खरा उत्सव म्हणजे दहिकाला. काल्याच्या दुसऱ्या दिवशी सकाळी गावकऱ्यांनी व सेवेकऱ्यांनी आणलेल्या पोह्यात दही कालवून त्याचे गोळे सर्वांना वाटतात आणि संध्याकाळी गवळणकाला होतो तो तर श्रीकृष्णाच्या बाललीलांवर आधारित असतो. शेकडो वर्षांची परंपरा या उत्सवामागे आहे. इतर देवालयांतूनही गवळणकाले होतात. पण श्रीकृष्णाच्या मंदिरात होणाऱ्या या काल्याच्या पाठीमागे जी परंपरा आहे, ती खरी कृष्णपरंपरा आहे.

असे हे देवकीकृष्ण संस्थान. एका संशोधनात्मक लेखात मी दाखवून दिले होते की, परशुराम व श्रीकृष्ण या दोघांनी गोव्याची आर्य वसाहत निर्माण केली. इतर देवदेवता या मानवांच्या कल्पनेतून साकार झालेल्या. श्रीकृष्ण मात्र कुणाच्या कल्पनेतून निर्माण झाला नाही. परमेश्वराचा हा पूर्णावतार प्रत्यक्ष गोव्यात आला होता. संबंध गोव्यात हिंडला होता. अनार्यांना त्याने आर्य धर्म दिला होता. गोपसंस्कृती त्यानेच इथे आणली होती. म्हणूनच श्रीकृष्ण ही गोमंतकाची राष्ट्रदेवता होय. त्याची सेवा या शब्दसुमनांनी करतां आली हें मी माझें भाग्य समजतों.

**

# The woman who defied orthodoxy

N. Purushothama Mallaya

The birth centenary of N. M. Saraswati Bai, first woman teacher of the Konkani-speaking Gowda Saraswath Brahmin community of Kerala, fell on Tuesday the 6th Saptember 1993,

Born in Cochin as the eldest daughter of Dasagranthi Hari Ranga Bhat, the chief priest of Thirumala devaswom temple, Cochin, Saraswati Bai studied Marathi at Karwar at the Veda Patasala, established by her father. She passed the seventh standard examination meritoriously.

Later, she joined the Christian Missionary School at Manjeswar, where she also learned Kannada, English, embroidery and needlework. Her extraordinary skill in embroidery and needlework fetched her prizes from the religious head of her community.

Besides Konkani, her mother tongue, she was also proficient in Sanskrit grammar and in Malayalam. She was equally conversant with the Vedas and the Bible.

She married K. Narayana Mallaya, who was staying at Andikadavu, a village seven km away from Cochin. For women belonging to the Gowda Saraswath community, there were no avenues for learning at that time. Saraswati Bai wanted girls of her community to study in schools.

She joined the Thirumala Devaswom High School, Cochin, as a teacher at the primary level. This was in 1908 when she was only 15 years of age. But the orthodox community was not willing to send their girls to school. Further, the elders of the community forced the headmaster to relieve Saraswati Bai of her duties. So she resigned her job.

Meanwhile, her husband opened a primary school in his village to help his wife fulfil her ambition. Saraswati Bai and her husband taught there for six years. The school had to be closed due to the non-cooperation of members of their community.

Undeterred, Saraswati Bai went to her parents' house in Cochin and applied for the post of a teacher at the Thirumala Devaswom school once again. She was appointed as a sewing mistress on a monthly salary of Rs 10. Her husband also joined the school as a class teacher of the primary level.

They were under the impression that Konkani was a dialectical variation of Marathi. Later, Malayalam was introduced as a subject in the school. As Saraswati Bai was a trained teacher in Marathi, she was given an additional post as Marathi teacher with an allowance of Rs 2.

As the first woman in her community who dared orthodoxy to become a teacher, Saraswati Bai was much respected.

**

# गोमंतकाचें वैशिष्ट्य

**कै. यशवंत सूर्यराव सरदेसाई**

*सर्वार्थानें भारताचा अविभाज्य घटक असलेल्या या चिमुकल्या गोव्याचीं कांहीं खास अशी वैशिष्ट्यें आहेत. गोमंतक आणि गोमंतकीय संस्कृतीचा सार्थ अभिमान बाळगणारे कै. यशवंतराव सूर्यराव सरदेसाई (भाई देसाई) यांचा गोमंतकियांच्या वैशिष्ट्यावर प्रकाश पाडणारा हा लेख आम्ही इथें पुनर्मुद्रित करीत आहोंत.*

गोमंतकाचें वैशिष्ट्य काय? असा कोणी प्रश्न केला तर त्याचें उत्तर चार शब्दांत देतां येईल. सत्य, सौजन्य, सौंदर्य व सेवा या चार शब्दांत गोमंतकाचें वैशिष्ट्य सांठलें आहे. या वैशिष्ट्याला धरून जे जे कार्य होते त्याला गोमंतकात यश व वृद्धि आहे. याला सोडून झालेली कोणतीही चळवळ इकडे फलदायी होत नाहीं हा अनुभव जुन्या काळापासून चालत आला असून हजारों उदाहरणांनीं तो सिद्ध झालेला आहे. गोमंतकाच्या वृथाभिमानाने अगर आंधळया प्रेमानें मी हें सांगत नाहीं, तर डोळसपणा वापरून हें म्हणतो. जरा खोल विचार केला व डोळयाचा डोळा उघडून गोमंतकाकडे पाहिले म्हणजे या म्हणण्यांत अर्थ आहे असे प्रत्येकाच्या प्रत्त्ययास येईल.

जन्मभूमि किंबहुना आपला प्रांत प्रत्येकाला प्रिय व श्रेष्ठ वाटतो यांत नवल नाहीं. मग या सुंदर व नितांत रमणींय प्रांतांत जन्म घेण्याचे भाग्य ज्याच्या वांट्यास आलें आहे, त्याला भूमीचें मनोहर स्वरुप पाहून आनंद व अभिमान वाटणें साहजिक नाहीं काय? पण हा विशिष्ट अभिमानापुरता मुद्दा नाही; तर इतर प्रांतांशी तुलना करून आणि सत्याला सर्वस्वी धरून म्हणावयाचे झाल्यास गोमंतकाचें एकंदर स्वरुप वर सांगितलेल्या वैशिष्ठ्यांच्या चौकटींत बसतें. सत्याकरतांच येथील वारे ढळतात, सौजन्याकरताच येथील पक्षी गातात, सौंदर्याकरताच येथील पहाड पालवतात आणि सेवेकरताच येथील नद्या वाहतात. निसर्गाची ही शिकवण मनन करण्यासारखी आहे. मुक्या प्राण्यांची ही हालचाल लक्षांत ठेवण्यासारखी आहे. मानवी मनाला धडा देणाऱ्या गोष्टी पदोपदी दिसत असतां त्या नाकारून कसें चालणार?

## बुद्धि व भावनेचा संगम

गोमंतकाची भूमि स्वरुपसंपन्न अशा कोंकणपट्टीत ह्रदयाच्या ठिकाणीं आहे. कोंकणची भूमि बुद्धिमत्ता व कर्तबगारी या दोन्ही दृष्टींनी इतिहासांत प्रसिद्ध आहे. आपली लेखणी आणि तलवार या दोन्ही नात्यांनीं हिन्दुस्थानचा इतिहास बनविण्याचे कार्य या लोकांकडून झालें आहे. अशा कोंकणच्या रेषेत मध्यगत ठाणें दिलेल्या गोमंतकानें बुद्धिबरोबर भावनेची जोपासना केलेली आहे. कारकुनी लेखणी सोबत मुत्सद्देगिरीची वाढ केलेली आहे. तलवार बहाद्दरी बरोबर निष्ठावंत गुणांची पराकाष्ठ आणि समरांगणावरील शत्रू नेस्तनाबूद करतांना मनोजयाच्या दृष्टीनेहि प्रशंसनीय कामगिरी बजावलेली आहे. मराठी इतिहासाचे अवलोकन केलें तर त्यांत गोमंतकीय विभूतींनी आपल्या जन्मभूमींचे वैशिष्ट्य राखायच्या बाबतींत सैदव जागरुकता ठेवलेली दिसते. सत्त्याचा पक्ष धरण्यांत काय किंवा सौंदर्याची उपासना करण्यांत काय, गोमंतकियांनीं देहाची पर्वा धरलेली नाहीं, जिवाची कदर बाळगलेली नाहीं अगर सत्ताधारी व्यक्तीचा मुलाहिजा राखलेला नाही. स्वतःचा बळी दिला, पण निष्ठावंत भाव मरूं दिला नाहीं. स्वाभिमानावर तिलांजलि दिली, पण राष्ट्राभिमान बुडूं दिला नाहीं. राज्य मिळवून दिलें पण राज्यलोभ धरला नाहीं. नव्या धन्याची सेवा केली पण जुन्या धन्याचा विसर पडूं दिला नाहीं. संबंध हिंदुस्थान ही आपली कर्मभूमि केली पण आपल्या जन्मभूमीचा अभिमान पुसूं दिला नाहीं. ही इतिहासाची केवळ कहाणी नव्हे, सत्यकथा आहे. शेकडों वर्षे नव्हे तर हजारों वर्षापासून तो हेच बोलत आहे मनापासून सांगत आहे अन् वैऱ्याच्या तोंडून देखील हीच कबुली देत आला आहे!

## सहृदय माणसाची मान्यता

मागच्या काळाकडे पहा. त्यांत घडलेल्या बनावांचे स्वरूप न्याहाळा. त्यांतील अनेक व्यक्तींच्या हालचाली लक्षांत आणा आणि वरील विधान यथार्थ आहे कीं नाही याची प्रचीति घ्या सत्यासाठी गोमंतकीय आत्मघातकी ठरला असेल. सौंदर्याच्या लोभानें तो वेडावून गेला असेल, सौजन्यापायीं त्याची स्थिति हास्यस्पद झाली असेल, सेवाधर्म बजावयाच्या भरांत तो स्वत्वहि विसरला असेल तथापि मार्मिक परीक्षकाच्या कसोटीला, चिकित्सक इतिहासकाराच्या प्रशंसेला व सहृदय माणसाच्या मान्यतेला तो पात्र झाल्यावाचून राहिलेला नाही हें देखील तितकेंच खरें आहे.

गोमंतकियांची ही वृत्ति महाराष्ट्रीय थोर पुरुषांनी वाखाणलेली आहे. महाराष्ट्रांतील राजकुलोत्पन्न थोर विभूतींनी या गुणाची चाह केली आहे आणि हिंदुस्थानच्या इतिहासांत या वृत्तींचे प्रतिबिंब सर्वत्र उमटलें आहे. कपट, द्रोह, उन्मत्तपणा, नाशवृत्ति, अधर्म या दुर्गुणाची मुळें या भूमीवर पडलीं तरी वाढ घेत नाहींत. संसर्गानें कांहीं भेसळ झाली तरी ती टिकून राहत नाही. आणि टिकली तरी तिला मान्यता नाहीं. साधा सरळ व्यवहार, प्रामाणिक उन्नत विचार, काळजाच्या कप्यांतून उघडलेला जीवनाचा झरा आणि एकमेकांना साहाय्य करण्यांत आयुष्याचा झालेला वेंच हींच गोमंतकाच्या मनोरचनेला प्रियतर लक्षणें आहेत. या व्यतिरिक्त झालेला प्रकार हा आयुष्याचा तमाशा होय. त्याला यश नाहीं, स्थैर्य नाहीं, मान नाहीं आणि इतिहासांत थाराहि नाहीं.

## गोमंतकीय कृतीवर भाळो

गोमंतक शब्दब्रह्माच्या जाळयांत अडकून पडत नाहीं. तो कृतीवर भाळून जातो. त्याला पंडित्याचा सोस नाहीं, तो प्रेमाचा भुकेला आहे त्याला शास्त्रालंकाराची मातब्बरी नाहीं, तो गुणांचा भोक्ता आहे. त्याला वकिलीचें तर्कट नको, सरळ न्यायाची अपेक्षा आहे. जाहिरातीचा हैदोस तो घालीत नाहीं, स्वतःच्या विश्वावर संतुष्ट राहण्यांत त्याला आनंद वाटतो.

गोमंतकाला मागासलेला प्रांत म्हणून कोणी नांव ठेवील; तो मागासलेला असला तर स्वतःची जाहिरात करण्यांत, जीवनाच्या लटपटी करण्यांत व आजकालच्या संभावित शब्दांची देवघेव करण्यांत! श्रीकृष्णांनीं वर्णिलेल्या दैवी संपत्तीच्या बाबतींत त्यांचा आढावा अजून नुकसानकारक नाहीं. ऋषींनीं महत्व दिलेल्या गृहस्थाश्रमीच्या बाबतींत तो अजून कंगाल झालेला नाहीं. श्रीज्ञानेश्वरांनी सांगितलेल्या माणुसकीच्या लक्षणांतून तो अजून उठलेला नाहीं. श्रीतुकारामांनीं केलेल्या विष्णुदासांच्या व्याख्येतून तो अजून गळलेला नाही. आणि जेव्हा जेव्हां या गोष्टींपासून तो दूर सरकूं लागतो तेव्हां तेव्हां थप्पड खाऊन त्याला परत आपल्या स्थानीं यावें लागतें. आपल्या जागेवर अढळ राहण्याची जणूं काय सर्वदमक काळाकडून त्याला इशारत मिळते!

## साधा भोळाच राहो

गोमंतक साधा भोळा आहे असें बाहेरचे लोक म्हणोत; ती बाब महत्त्वाची नाहीं. किंबहुना उपेक्षणीय आहे तो साधा भोळाच राहो असें मी म्हणेन पण अहंकाराचा वारा त्याला न लागो; दंभाची पीडा त्याला न बाधो, आणि असलेले अंगचे गुण घालविण्याची बुद्धि त्याला न होवो! इतर लोकांकडून गुण आम्हीं मिळवावे पण त्याबरोबरच असलेले संरक्षित करावे; इतर लोकांच्या वर्तनापासून आम्हीं बोध घ्यावा, पण त्याबरोबर आपली रेषा धरून असावें; इतर लोकांचे डावपेच आम्ही ओळखावे; पण ते सावधगिरीनें वागण्यासाठी.

इतरांचा फायदा आम्हीं घ्यावा; पण तो प्रेमाचा मोबदला देऊन. इतर लोकांत आम्हीं मिसळून जावें; पण स्वत्वाची जागृति ठेवून. इतर लोकांकरतां आम्ही सुखनैव राबावें; पण ते कर्तव्यबुद्धीनें आणि इतर लोकाचा इतिहास बनविण्यांत आम्ही मदत करावी पण ती स्वतःचा इतिहास न गमावता. आमच्या पूर्वजांची आंखलेली रेषा ही, आणि ती तशीच पुढें ओढीत नेणें हेच आमचें खरें तत्व!

## पुण्यभूमि

या तत्वांची घोषणा गोमंतकाची भूमि कणाकणांतून करीत आहे. या ध्येयाची इशारत उंच मान करून उभे राहिलेले माड आपल्या झावळयांच्या शिरशिरांतून देत आहेत, हा मार्ग चोखाळण्याचा संकेत पिवळया चिमण्या आपल्या मोहक सुरासुरांतून दिवसानुदिवस काढीत आहेत आणि हे कर्तव्य बजावण्याची गर्जना पर्वतांच्या दरी-गुहांतून रातबेरात ऐकू येत आहे! माणुसकी राखून काम करावें. माणुसपण हें पहिलें स्वीकारलेला पेशा नंतर. तो इमानेइतबारें, कर्तव्यबुद्धीने सजवावा; पण अंतरीचा ज्ञानदिवा सदैव प्रज्वलित असावा. निज हृदयींचीं खूणगाठ अशी दृढ बांधलेली ठेवावी. रस्त्याच्या आखीव जागेतून

प्रवास करतांना ध्येयाच्या मुक्कामाकडे दृष्टी असावी. तत्त्वाची शिकवण हेंच या भूमीचे वैशिष्ट्य आहे. गोमंतकाची भूमी पुण्यभूमि होय! या भूमीवर हजारों वर्षांपासून अनेक थोर पुरुषांनीं व महात्म्यांनीं आपल्या कर्तबगारीचा शिक्का मारलेला आहे. सर्ववंद्य ऋषिमुनींच्या आध्यात्मिक साधनाला या भूमीचा आश्रय मिळालेला आहे. बुद्धिमान अशा शेंकडों माणसांच्या कार्याचा इतिहास या भूमीवर रचला गेला आहे अनेक कवींच्या कल्पनेचीं बीजें या भूमींतील ओलाव्यांनें उगवून प्रसन्नपणें भरारलीं आहेत. शेंकडों लोकांच्या तरवारींनीं या भूमीवर आपली क्रीडा केली आहे. शेंकडो लोकांच्या लेखण्यांनीं या भूमीचा ज्ञानपट चित्रित केला आहे. आणि शेंकडों लोकांच्या सद्भावनेनें या भूमितील नितिधर्माची जोपासना झाली आहे!

ही भूमि पुण्यभूमि नाही असें कोण म्हणेल? भगवान परशुरामाच्या वास्तव्यानें पुनीत झालेली, योगेश्वर श्रीकृष्णाच्या पादस्पर्शानें भूषित झालेली, कदंबकुलीचे आहेरघर बनलेली, विद्यारण्य माधवाचें मस्तक नम्र करणारी, शिवाजी महाराजांना पाहून धन्य झालेली. संभाजीच्या पराक्रमाची साक्षीदार बनलेली नारोराम, रामचन्द्र मल्हार, जिवाबादादा, लखबादादा असे शेंकडों मुत्सद्दी वीर प्रसवलेली, जगातल्या शेंकडों प्रदेशांतून चमकलेल्या व युरोप अमेरिकेंत आपल्या बुद्धिमत्तेच्या प्रभाव गाजविणाऱ्या अनेक ख्रिस्ती बांधवांना जन्म देणारी ही भूमि, पुण्यभूमि नाहीं असे कोण म्हणेल?

## गोमंतकीय सत्त्यासाठी झगडला

इतिहासांतील कोणताहि भाग वाचा आणि त्यावरून तुम्हांला समजून येईल कीं, गोमंतकीय माणूस सत्त्यासाठीं झगडला आहे. त्याची समजूत चुकीची झाली असेल, पण जी झाली व त्यावरून त्यानें जो मार्ग आंखला, तो पाहिला तर सत्त्याकरताच त्याची धडपड होती असें आढळून यैईल.

सौंदर्य हें तर त्याच्या जन्मभूमींचे अंग त्याचें संवर्धन करणें हा गुण त्यानें मातेपासून उचलला आहे यांत नवल कसलें? चित्रकला घ्या, शिल्पकला घ्या, काव्यरचना घ्या, अगर साध्यासिध्या आयुष्यक्रमाची संगति लक्षांत आणा, त्यांत महत्त्वाने डोळयांत भरण्यासारखीच गोमंतकियांची कृति असेल.

सौजन्य हा भाग गोमंतकीयांचा गुणधर्म आहे आणि सेवा ही तर त्याची उपास्यदेवता होय!

यापासून जो ढळला गेला त्याच्या कार्यास यश नाही आणि महत्वही नाहीं. या गुणावरच गोमंतकीय माणसांचे वैशिष्ट्य आहे.

## सत्य हें आपलें ब्रीद

सत्य, नीति, दया, क्षमा, शांति, प्रेम, वात्सल्य हे गुण मूर्तस्वरूपानें ज्या भूमींत नांदतात, वावरतात, वाढतात व सुखाची देवघेव करतात ती भूमि पुण्यभूमि नव्हे तर काय?

म्हणून गोमंतकीयांनीं याच गुणांची वृद्धि करणें याच गुणांचे महत्व वाढविणे आणि याच गुणांचे पीक सर्व भूमींतून काढणे हाच खरा पुरुषार्थ होय!

गोमंतकाच्या भूमींत भलत्या बियांची पेरणी उगवणार नाहीं. या भूमींत नसत्या झाडाची लागवड केली तर ती वृथा होईल. त्या खटाटोपापासून कांहींच निष्पन्न नाही तर उलट अपेशाचे भागीदार व्हावें लागेल. व्यक्तीचा स्वभाव पाहून उपदेश, भूमीचा गुण पाहून लागवड केली पाहिजे. हिंसेचा उठाव इकडे होणार नाहीं. असत्याचा बाजार इकडे भरणार नाहीं. गर्वांच्या ताठा इकडे टिकणार नाहीं. कर्मठपणाचे बाह्य सोंग इकडे मिरवतां येणार नाहीं. शुष्क विद्वत्तेचा उग्र वास इकडे महत्व पावणार नाहीं आणि व्यवहारापासून अलिप्त असलेलें तत्वज्ञान इकडे जीव धरणार नाहीं. या भूमीचाच तो गुण आहे.

म्हणून या आपल्या पूज्य व पवित्र गोमंतकाच्या भूमीत जे गुण विशेषत्वाने नांदत आहेत त्यांचा अभ्यास करणें, त्या गुणांशीं तादात्म्य पावणें; त्या गुणांचा प्रसार करणें आणि त्या गुणांचा उत्कर्ष करणें हेंच आपलें काम आहे.

जी जी गोष्ट सत्त्याच्या कक्षेत येईल तीं ती करणें हें आपलें ब्रीद आहे. जी जी गोष्ट सौजन्याच्या मर्यादेंत असेल तीं ती करणें ही आपली परंपरा आहे. जी जी गोष्ट सौंदर्याच्या स्वरुपांत दिसेल तीं ती करणें ही आपली शिकवण आहे, आणि जी जी गोष्ट सेवाधर्मानें मूल्यांकित असेल ती ती करणें. मनापासून करणें; निरपेक्ष बुद्धीनें करणें. किंबहुना जिवाचा मोबदला देऊन करणें हें आपले कर्तव्य आहे. आपल्या थोर पूर्वजांचा हाच संप्रदाय आहे आणि तो आपण पुढें चालविणें यांत आपल्या जन्माचे सार्थक आहे!

**

# पेडणेकरांचा सातर्डे मठ

**मधुकर सामंत**

*सारस्वत समाजामध्ये जे विविध संप्रदाय आहेत, त्यापैकी पेडणेकर या नांवाने ओळखला जाणारा एक संप्रदाय आहे. या वर्गातील लोक पेडणेकर ब्राह्मण या नांवाने ओळखले जातात आणि ते सातर्डे मठाचे अनुयायी होत. या मठाचा संक्षिप्त परिचय आम्ही येथे प्रसिध्द करीत आहोत.*

कोकणाख्याना'च्या पूर्वार्धामध्ये पांचव्या अध्यायांत 'देशत्रयवर्णन' आहे त्यामध्ये पेडणे देश आणि पेडणेकर ब्राह्मण यांचे तपशीलवार वर्णन आहे. त्यांचा सातर्डे मठ असल्याचे गेली ४० वर्षे ऐकिवात होते. त्याचा आतां शोध घेतल्यानंतर माहिती मिळाली ती अशी.

### नाव आणि पत्ता.

'श्रीमठ संस्थान बालाश्रम' मुक्काम पोस्ट सातर्डे, तालुका-सावंतवाडी, जिल्हा सिंधुदुर्ग (महाराष्ट्र राज्य) पिन कोड ४१६ ५१४ असे नाव व पोस्टाचा पत्ता असलेल्या पेडणेकरांच्या धर्मसंस्थानाला पोचायचे झाल्यास सावंतवाडीहून सातर्डे मार्गे गोव्याच्या दिशेने जाणाऱ्या बसमधून सातर्डे येथील रवळनाथ मंदिर थांब्यावर उतरून रवळनाथ ते माऊली देवळापर्यंत प्रथम कच्या रस्त्याने जावे लागते. अलिकडे हा रस्ता मठाच्या दिशेने पुढे वाढवला असून या विस्तारित रस्त्याने पुढे जाताना उजवीकडे तळे दिसते. ते संपताच रस्त्याच्या उजवीकडे मठाकडे जाणारा रस्ता आखला आहे, पण अद्याप बांधलेला नाही. तेथून मठाची इमारत दिसते. बस मार्गावरील रवळनाथ-थांबा ते मठाची वास्तु यांमधील अंतर सुमारे २ किलोमीटर (सुमारे सव्वा मैल) असावे.

### मठाची जोड इमारत

सुमारे साडेतीनशे वर्षांपूर्वी बांधलेली मठाची दक्षिणोत्तर जुनी वास्तू आणि तिला काटकोन करून सुमारे ८० वर्षांपूर्वी पूर्व-पश्चिम बांधलेला सभामंडप अशी मठाची जोड इमारत आहे. मठाच्या जुन्या वास्तूचे चटईक्षेत्र सुमारे ४५ फूट लांब व १६ फूट रुंद आहे व सभामंडपाचे चटईक्षेत्र ५६ फूट लांब व ३० फूट रुंद आहे. जुन्या इमारतीमध्ये मुख्य समाधीला लागून उत्तर दिशेला आणखी चार अशा एकूण पाच समाध्या आहेत. जुन्या वास्तूला जोडून दक्षिण दिशेला स्वयंपाकघर किंवा पाकशाळा आहे आणि त्याच्या दक्षिण-पूर्व (ईशान्य) दिशेला गोशाळा-गोठा आहे. मठाच्या ताब्यांतील सभोवतालच्या एकूण जमिनीचे क्षेत्रफळ १४ एकर पावणेसतरा गुंठे एवढे आहे. त्याच्या सर्व आवश्यक नोंदी सरकारदरबारी कागदपत्रात नमूद केलेल्या आहेत. श्री. शिव गोंदे प्रभु यांनी इ. स. १७०९ मध्ये मठाचे नावे जमीन दानपत्राने दिल्याचा दस्तऐवज आहे.

### मठाधिपतींची नामावली

सातर्डे येथे मठस्थापना झाल्यानंतर आतापर्यंतच्या मठाधिपतींची नांवें पुढील प्रमाणे आहेत.

१. श्रीमत् बालाश्रम स्वामी
२. श्रीमत् आनंदाश्रम स्वामी
३. श्रीमत् कृष्णाश्रम स्वामी
४. श्रीमत् गोपालाश्रम स्वामी
५. श्रीमत् बालाश्रम स्वामी
६. श्रीमत् आनंदाश्रम स्वामी
७. श्रीमत् कृष्णाश्रम स्वामी
८. श्रीमत् गोपालाश्रम स्वामी

सातर्डे मठ ज्यांच्या नावानें ओळखला जातो त्या सुरवातीच्या श्रीमत् बालाश्रम स्वामी महाराजांची मुख्य समाधी जुन्या वास्तूतील गाभाऱ्यांत असून तिच्या उत्तर दिशेला वर उल्लेखिलेल्या क्रमांक २, ४, ५ आणि ६ पुढील स्वामींच्या क्रमवार समाध्या आहेत. वर क्रमांक ३ आणि ७ पुढे उल्लेखलेल्या मठाधिपतींच्या समाध्या अनुक्रमे सातर्डे येथील माऊलीच्या देवळाशेजारी आहेत. वर क्रमांक ६ पुढे उल्लेखलेल्या स्वामींचे रेखाचित्र आणि क्रमांक ७ पुढे उल्लेखलेल्या स्वामींचे छायाचित्र सभामंडपांत आहे.

## मठाची बिरुदावली

प्रत्येक मठाचे वैशिष्ट्य दर्शविणारी अशी खास बिरुदावली पुढीलप्रमाणे आहे.

*श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य पदवाक्यप्रमाण पारावार पारीण यमनियमाद्य अष्टांग साधन-संपन्न सकलसुरनिकर स्फुटमुकुट नीराजित दिव्यश्रीलक्ष्मीनारायण पादारविंद आराधक श्रीमत् बालाश्रम स्वाम्यनुग्रहीत श्रीमत् आनंदाश्रम स्वामि करकमलसंजात श्रीमत् कृष्णाश्रम स्वाम्यंतःकरण संजात श्रीमत् गोपालश्रम स्वामि श्रीपादः*

सातर्डे येंथील मठाचे आराध्यदैवत श्रीलक्ष्मीनारायण असल्याचे बिरुदावलीत नमूद आहे. सुरवातीला सातर्डे मठाच्या पहिल्या दोन मठाधिपतीचा आणि शेवटी विद्यमान मठाधिपती धरून शेवटच्या दोन मठाधिपतींचा अशा चार स्वामींचा बिरुदावलीत नामनिर्देश करण्याचा या मठाचा प्रघात दिसतो.

## शंकराचार्यान्वयी मठ

स्मार्त संप्रदायी परंतु शैव पंथाचा नव्हे म्हणजे श्री आदि शंकराचार्याच्या अद्वैत तत्त्वज्ञानानुसार शिव आणि विष्णु यांचे ऐक्य मानणारा सातर्डे हा शंकराचार्यान्वयी मठ दिसतो. शैव व वैष्णव अशा दोन्ही पंथाचे लोक या मठाचे उपासक आहेत. पेडणे, सातर्डे, धारगळी, पार्से या भागातील पेडणेकरांप्रमाणे प्रभुगांवकर, तेंडुलकर, पाटील, सामंत अशा आडनावाचे कुडाळदेशकर सुद्धा या मठाचे उपासक आहेत. विशेषतः मंगळूरसारख्या दूरच्या ठिकाणी राहणारे भक्त मोठ्या श्रद्धेने या मठाच्या स्वामींच्या दर्शनाला येतात. शृंगेरीच्या शारदा पीठाच्या परंपरेतील संकेश्वर (करवीर) मठाचे सातर्डे मठाला संरक्षण, नियंत्रण आणि मार्गदर्शन लाभते ही वस्तुस्थिती सध्याच्या स्वामीजींचे गुरू श्रीमत् कृष्णाश्रम स्वामी यांच्या कार्यकालात घडलेल्या काही घटना त्यानी विद्यमान मठाधिपतींना कथन केल्या होत्या त्यावरून स्पष्टपणे ध्यानात येतें.

## पेडणे देशीची पूर्वपीठिका

सातर्डे येथील मठाचे संस्थापक श्री. बालाश्रम स्वामी यांचे गुरुस्वामी कोण, पेडणेकरांचा हा मठ पेडण्याच्या हद्दीबाहेर तेरेखोल नदीच्या अलिकडे पूर्वीच्या सावंतवाडी संस्थानात किंवा त्यापूर्वीच्या कुडाळदेशात कसा, हे प्रश्न आज तरी अनुत्तरित आहेत. पेडणेदेशाच्या हद्दीत पेडणे, पार्से, धारगळी येथे मठाचे अवशेष आजही आहेत. श्री. बालाश्रमापूर्वीच्या तीन स्वामींच्या समाध्या काशी क्षेत्री झाल्या. स्वतः श्रीबालाश्रम हेसुद्धा पेडण्याची हद्द सोडून त्या दिशेनेच रागाने निघाले होते. पेडण्यातील प्रसिद्ध देशप्रभु घराण्याचे मूळ पुरुष श्री. नागेश प्रभुदेसाई यानी मोठ्या मिनतवारीने त्यांना शांत केले. व स्वामीजींची श्रद्धापूर्वक पाद्यपूजा केली, त्याना तुमच्या सात पिढ्या सत्ता, संपत्ती व ऐश्वर्य भोगतील असा स्वामीजींनी शुभाशीर्वाद दिला. पोर्तुगीज सत्तेपासून गोवा स्वतंत्र झाला त्यावेळचे श्री. काकासाहेब हे त्यानंतरचे पेडणे देशाचे देशप्रभु घराण्यातील सातव्या पिढीचे प्रतिनिधी होत, श्री. बालाश्रम स्वामी काशी यात्रेच्या वाटचालीत सातर्डे येथे पोचले असता तेथील श्रीदेव रवळनाथ यांच्या आज्ञेनुसार तेथे राहिले व तेव्हापासून पुढे सातर्डे मठ अस्तित्वात आल्याची गुरुपरंपरागत माहिती विद्यमान स्वामीजींकडून समजली.

सातर्डे मठाच्या शिक्क्यावर "श्री मुळवीर पाचशी सती श्री बालाश्रम यती" असा मुळवीराच्या नावाचा उल्लेख आहे ते सातर्डे पूर्वीच्या पेडणे येथील मठाचे मूळ संस्थानाधिपती असावेत. पेडणे शहराच्या हद्दीत मालपे भागात श्री मूळवीराचे देवस्थान आहे त्याचा उल्लेख श्रीधर स्वामी असा केला जातो. हे मूळवीर श्रीधरस्वामी आणि त्यानंतर काशीक्षेत्रात समाधी घेतलेले तीन स्वामी असे सातर्डेपूर्वीचे चार स्वामी जमेस धरता विद्यमान मठाधिपती हे बारावे स्वामी असण्याचा संभव आहे. सातर्डे मठाच्या पार्श्वभूमीवर दिसणारी ही पेडणेदेशीची पूर्वपीठिका अस्पष्ट व धूसर असली तरी इतिहास संशोधनाच्या दृष्टीने दिशादर्शक आहे.

## विद्यमान मठाधिपती

विद्यमान मठाधिपती श्रीमत् गोपालाश्रम स्वामी हे २५ जुलै १९५५ पासून आजतागायत पीठासीन आहेत. त्यांचा जन्म १९३९ सालचा असून सध्या त्यांचे वय ६० वर्षांचे आहे. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव गोविंद श्रीपाद शेणई असे होते. (शेणई किंवा शणै हे आडनाव शेणवी ज्ञातिबोधक नसून ते कुडाळदेशकर पेडणेकर अशा इतर ज्ञाति घटकातही आढळते) यापूर्वीचे अनेक मठाधिपती याच घराण्यातील होते. श्री गोपालाश्रम स्वामीना वयाच्या २१ व्या वर्षी संन्यासदीक्षा व शिष्यस्वामीची उपाधी मिळाली आणि त्यांच्या गुरुकडून त्याना जेमतेम तीन वर्षे शिक्षण मिळाले. गुरुमुखांतून कानावर पडलेली मठासंबंधी थोडीफार ऐतिहासिक माहिती विद्यमान मठाधिपतींनी कथन केली. बहुतांशी त्यांच्या सहकार्यामुळे सातर्डे मठाचा हा परिचय लेख तयार होऊ शकला.

### मठाचे व्यवस्थापन

सातर्डे गाव गोव्याच्या हद्दीबाहेर भूतपूर्व मुंबई प्रांतात असल्यामुळे मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५० या कायद्यातील तरतुदीनुसार श्रीमठ संस्थान बालाश्रम ही विश्वस्त संस्था म्हणून १९५२ पासून नोंदलेली आहे आणि धार्मिक व आध्यात्मिक बाबी वगळता ह्या विश्वस्त संस्थेंच व्यवस्थापन व प्रशासन यावर राज्य शासनाच्या धर्मादाय आयुक्तांच्या कार्यालयाचे नियंत्रण असते. दरवर्षी कार्तिक शुद्ध चतुर्थीला श्रीमद् बालाश्रम स्वामींच्या पुण्यतिथीचा मुख्य कार्यक्रम असतो. त्याशिवाय मठात दरमहा विनायकी साजरी करतात. आर्थिक दृष्ट्या हा मठ सर्वात दुर्बल दिसतो. मठाचे वार्षिक उत्पन्न जेमतेन रु. २,५०० असून खर्च सुमारे रु. ३,५०० आहे. मर्यादित उत्पन्न आणि महागाईमुळे वाढता खर्च याची तोंडमिळवणी कशी करावी याची या मठाला विवंचना आहे. सेवकवर्गाऐवजी स्वामीजींच्या घराण्यातील माणसे केवळ आत्मीयतेच्या भावनेने मठात राबतात म्हणून मठाचा संसार चालू आहे.

इतर बहुतेक मठासंबंधी ऐतिहासिक व इतर माहिती लेख, ग्रंथ वा पुस्तकरुपाने उपलब्ध असली तशी सातर्डे मठाची स्थिती तशी नाही. या मठासंबंधी एखादा लेखसुध्दा प्रसिद्ध झाल्याचे आढळत नाही. पेडण्यातील सुप्रसिद्ध देशप्रभु घराण्यातील श्रीमान वासुदेव आत्माराम ऊर्फ काकासाहेब देशप्रभु यानी सातर्डे मठाचा इत्यंभूत इतिहास विद्यमान मठाधिपतीचे गुरुस्वामी श्रीकृष्णाश्रम स्वामींच्या मार्गदर्शनाखाली लिहिलेला असून तो त्यानी प्रसिद्ध करण्यासाठी म्हणून स्वतःकडे ठेवला होता. इतिहास-लेखनासंबंधी सर्व कागदपत्रसुद्धा त्यांच्याकडेच होते. परंतु त्यांचे देहावसान झाल्या नंतर या लिखाणाचा अद्याप कोठे ठावठिकाणा लागलेला नाही अशी माहिती विद्यमान मठाधिपतींकडून मिळाली. भविष्यकालीत यदाकदाचित हे हस्तलिखित सापडले तर सातर्डे मठाच्या इतिहासावर सुस्पष्ट प्रकाश पडण्याची शक्यता आहे.

('सारस्वत-चैतन्य' मधून साभार)

**





# परशुरामाचे वंशज

परशुरामान अपरान्तांत जे धा सारस्वत ऋशी हाडले तांचीं सासश्ट कुळां आसलीं. सह्याद्री खंडांत तेविशीं बरयलांः

"दशगोत्रकरा विप्रा त्रिहोत्रपुरवासिनः।
आनीताः परशुरामेण स्वकार्यार्थस्य सिद्धये।।
हे शंभो तस्य विस्तारं कथयस्व समासतः।

**ईश्वरउवाच** ।
शृणु पुत्र साधु पृष्टं किं योगंच कथं स्थितिः।।
ब्राह्मणा दशगोत्राश्च कुलं षट्षष्टिकं स्मृतं ।
कुशस्थल्यां कर्दल्यां च गोत्रांणि स्थापितानि हि ।।
कौत्सं वत्सं च कौंडिण्यं गोत्रं दशकुलान्वितं ।
एते त्रिगोत्रजा विप्रा उत्तमा राजपूजिताः।।
सुदर्शनाः सदाचाराश्चतुराः सर्वकर्मसु ।
मठग्रामे वरेण्यं च लोटली च कुडस्थली ।।
षट्-षडेतेषु ग्रामेषु कुलानि स्थापितानि वै ।
चूडामणि महाक्षेत्रे कुलानि दश एव हि ।।
स्थापिताश्चात्रभो देवा भार्गवेन तु यत्नतः ।
दीपवत्यां कुलं चाष्टं स्थापितं च यथाविधि ।।
गोमांचले मध्यभागे कुलं द्वादश स्थापितं ।
एवं षट्षष्टिका विप्राः स्थापिताश्च परस्परं ।।
प्रादाय तेषां रामेण कुशस्थलिनिवासिनां ।
सासष्टिद्विजमुख्यानामधिकारं ददौ तदा ।।

**(सह्याद्रि खं., उत्त., अ. १-४, गोमंतक इति., पृ. ३५)**



